


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# अनुक्रम



---

□ प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
□ संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
□ संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३६८६९३
□ व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवन, पुणे ४११००४ दूरध्वनी : ३३३८६९
□ पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.
□ सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
□ या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशत: अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
□ संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
□ मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९

# भाषेशी घसट - चांगल्या अर्थाने

**मृणालिनी शहा**

''अतिपरिचयादवज्ञा...'' एका संस्कृत सुभाषितातील ओळीचा अर्धांश मराठीत ''अतिपरिचयात् अवज्ञा'' असा वाक्प्रचार म्हणून रूढ झाला आहे. याचा शब्दकोशातील अर्थ - 'कुणाकडे अतिजाण्याने किंवा अतिस्नेहाने आपला आदर, मान राहात नाही असा आहे. आपण सामान्यतः हा वाक्प्रचार व्यक्तीच्या संदर्भात वापरत असलो तरी त्याला एक व्यापक अर्थही प्राप्त झालेला आहे आणि तोच अर्थ येथे अपेक्षित आहे. थोड्या आत्मपरीक्षणाने आपल्या लक्षात येईल की: दैनंदिन जीवनात अतिपरिचयाने कित्येक महत्त्वाच्या गोष्टींची अवज्ञा आपण करीत असतो. कितीतरी नित्यपरिचयाच्या बाबींची आपल्याला किंमत कळत नाही किंवा त्यांचे महत्त्वही लक्षात घेतले जात नाही.

अशा अवज्ञात बाबींपैकी एक म्हणजे भाषा! मग ती मातृभाषा असो वा व्यवहाराची भाषा असो! आपल्या जीवनाला व्यापून उरणाऱ्या भाषेचा आणि आपला परिचय इतका घनिष्ठ असतो की तिचे वेगळे अस्तित्वच आपल्या लक्षात येत नाही. स्वाभाविकपणेच तिचे महत्त्वही आपण जाणत नाही आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे तिची अवज्ञा आपण करीत आहोत हेही आपल्या गावी नसते.

आपल्या आसपास पाहिले तर पन्नास टक्के लोक (ही टक्केवारी खरे तर त्याहूनही कमीच आहे आणि ती फारशी काटेकोरही नाही) जीवनात यशस्वी होतात. हे यश शैक्षणिक किंवा आर्थिक नसून समग्र जीवन असा अर्थ अपेक्षित आहे. त्यांच्या यशाच्या कारणांचा बारकाईने शोध घेतला तर लक्षात येते की त्यांची भाषाभिव्यक्ती किंवा भाषेवरचे प्रभुत्व हेही एक कारण निश्चितपणे असू शकते. आपल्या या भाषिक कौशल्याची उघडपणे जाणीव मात्र त्यांना नसते. असे का बरे होत असावे? याचे कारण आपण भाषा कधी आणि कशी शिकतो तेच आपल्याला कळत नाही. ते समजण्यासाठी भाषेची शिक्षण प्रक्रिया पाहूया. मूल जन्माला येते आणि हळूहळू मोठे होते. ही त्याची वाढ होत असताना ते मूल त्याच्या आईवडिलांची - त्याच्या घरातील भाषा आणि त्या परिसरातील भाषा शिकत असते. हे त्याचे

शिक्षण अनुकरणातून होते. शिवाय ते सहजतेने होत असते. हे अनुकरण कधी कळत तर कधी नकळत होत असते. ध्वनि - उच्चारणापासून ते वाक्यरचनेपर्यंतच्या सर्व गोष्टी ऐकत ऐकत आणि त्याचे अनुकरण करीत करीत मूल भाषा आत्मसात करीत असते. मानवाच्या मेंदूतील भाषिक क्षमतेमुळे त्याच्या भाषेचाही विकास होत जातो. भाषा आपल्या जन्मापासून आपल्या बरोबर असते. आपले जगाविषयीचे ज्ञान आणि आपले अनुभव आपण भाषेतूनच घेत असतो. किंबहुना भाषा आणि आपण एकमेकांच्या हातात हात घालून वाढत असतो आणि त्यातूनच आपल्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होत असतो.

भाषेतूनच आपला इतरांशी संवाद होत असतो. संवादाशिवाय मानवी समाजाला अस्तित्वच प्राप्त होत नाही. व्यक्ती व समाजाच्या अस्तित्वाकरिता आणि विकासाकरिता परस्परांत विचारांची देवाण-घेवाण होणे आवश्यक असते. ही देवाण-घेवाण संवादातून-भाषेच्या माध्यमातून होत असते.

संवादाच्या व्यवहारातून कोणीच सुटत नाही. एकमेकांशी आपला असणारा संबंध संवादाद्वारेच असतो. आपल्या जीवंनातील यश हे बरेचसे आपला संवादव्यवहार किती परिणामकारक व प्रभावी असतो, यावर अवलंबून असते. ज्यांच्या जवळ संवादकौशल्ये आणि भाषिक कौशल्ये अधिक असतात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास अधिक चांगला होतो. आता सर्व व्यक्तींजवळ ही भाषिक कौशल्ये उपजत असतात असे नाही. काहींना ती सहजसाध्य होत असली तरी बाकीच्यांना ती कौशल्ये, ते कसब, ती कला निश्चितच आत्मसात करून घेता येते. त्यासाठी गरज आहे ती प्रयत्नांची. पण दुर्दैवाने खूप लोकांना या कौशल्यांचे आणि पर्यायाने भाषेचे महत्त्वच कळत नाही. त्यामुळे त्याविषयीची सजगताही त्यांच्याजवळ नसते.

अशा प्रकारच्या लोकांची अनेक उदाहरणे आसपास दिसतात. तथापि त्यांपैकी विद्यार्थी वर्ग किंवा तरुणपिढी या एकाच उदाहरणाकडे लक्ष केंद्रित केल्यास काय दिसते ते पाहूयात. कला, विज्ञान आणि वाणिज्य या तीनही विद्याशाखांतील शिक्षणामध्ये भाषा 'माध्यम' म्हणून येत असते. कोणताही विषय भाषेतून शिकावा लागतो आणि परीक्षाही त्या भाषेतूनच द्यावी लागते. परंतु या माध्यमाकडे लक्ष न देण्याने विषय येत असूनही कित्येक वेळा लेखी परीक्षेत अपेक्षित यश मिळवता येत नाही. परीक्षकांशी भाषिक संवाद साधता न येणे हा एक प्रमुख घटक अपयशामागे असू शकतो.नेमक्या

व योग्य शब्दात विषयाची मांडणी करणे अतिशय आवश्यक असते आणि त्यासाठी भाषेवर प्रभुत्व असावे लागते आणि ते नसले तर ज्ञानाबरोबर तेही कमवावे लागते. ती यश:प्राप्तीची किल्ली आहे. ही गोष्ट फक्त कला किंवा सामाजिक शास्त्रांच्या बाबत असते असे नाही. विज्ञान आणि वाणिज्य याही ज्ञानशाखेतील विद्यार्थ्यांना विषय ग्रहणासाठी आणि तो परीक्षेत (किंवा इतरत्रही) मांडण्यासाठी 'भाषा' ह्या माध्यमाची अत्यंत गरज असते. ही अभिव्यक्ती फक्त परीक्षेपुरतीच मर्यादित नाही. जीवनातल्या कोणत्याही क्षेत्रात-वैचारिक किंवा भावनिक क्षेत्रात - अभिव्यक्ती संवाद बरोबर साधण्यासाठी भाषिक कौशल्याची मदत लागते. कौशल्य नसेल तर ते आत्मसात करावे लागते. तरच आपल्याला यश:प्राप्ती होते. जीवनातही अशीच माणसे यशस्वी होतात. आपल्या जीवनातील यशाचा थेट संबंध असा भाषेपर्यंत येऊन पोहोचतो, हे लक्षात आले की आपण भाषेची अतिपरिचयाने होणारी अवज्ञा करणार नाही. किंबहुना ती करू नये.

□□□

*तुकोबाचा निदान एक*
*अभंग ज्याला पाठ येतो*
*तो मराठी माणूस !*
*'ज्यांच्या घरी नाही*
*तुकोबाची गाथा'*
*त्याच्या शिरी लाथा*
*हाणा चार !*

**(आचार्य अत्रे ह्यांनी केलेली मराठी माणसाची व्याख्या)**

# मराठी माणसाच्या भाषिक गरजा : एक चार कलमी योजना

अशोक रा. केळकर

एखादा प्राणी कोंडीत सापडला, तर तो एक तर लढू पाहतो, किंवा पळायला वाट शोधतो. तो प्राणी म्हणजे असहाय्य, असं माणसाचं पिलू असलं तर? तर ते मूल आरडाओरडा करतं, किंवा रडून गोंधळ घालतं. मग भोवतालची वडीलधारी माणसं त्याची समजूत घालू लागतात, कसंही करून मुलाचं आरडणं किंवा रडणं बंद झाल्याशी कारण. मुलाच्या या प्रतिक्रियेचं मूळ कारण हुडकून ते दूर करण्याची कोण खटपट करतो? एक मे १९९८ रोजी म्हणजे मराठी भाषादिनी या सगळ्याची आठवण होण्याजोगतीच एकूण स्थिती आहे.

१९७९ हे वर्षं केंद्र सरकारनं राजभाषा वर्ष म्हणून जाहीर केलं आणि मराठी माणूस आणि महाराष्ट्र शासन यांना जाग आली आणि मराठी भाषेची दशा बरी नसल्याचं त्यांच्या ध्यानात आलं. आज इतक्या वर्षांनी काय प्रगती झाली आहे? सामान्य मराठी माणसं मराठीचा पक्ष घेऊन त्वेषानं आरडा-ओरडा करतात. (फार तर इंग्रजीच्या किंवा हिंदीच्या नावानं बोटं मोडतात!) किंवा मराठीच्या नावानं मोठ्यानं गळा काढतात. वडीलधारी माणसं आणि शासन त्यांची कशीबशी समजूत घालत आहे. (काही हुशार मंडळी मराठीच्या पूर्ववैभवाच्या खुणा म्हणजे ज्ञानेश्वरी किंवा तुकारामाची गाथा यांचा अफूच्या गोळीसारखा उपयोग करतात. बिचारे ज्ञानेश्वर आणि तुकाराम!

राजभाषा वर्षाच्या निमित्तानं जी जाग आली तिचा फायदा घेऊन गेली वीस एक वर्ष मी शासनाला आणि लोकांना काही ऐकवतो आहे. हेतू हा, की या दोघांच्या नकारात्मक प्रतिक्रियेला काही सकारात्मक वळण लावता येईल का ते पाहावं. मराठीचा विकास आणि महाराष्ट्राचा विकास एकमेकांशी अगदी निगडित आहेत. कारण कोणत्याही सर्वांगीण विकासात समाजाच्या भाषिक गरजांचा आणि त्यांच्या पूर्तीचा विकास अंगभूत असतो हे मुख्य सूत्र पकडून लोकांनी आणि शासनानं पुढं चालावं अशी माझी खटपट आहे. हाती काय आलं? लोक अजून नकारात्मक आरडाओरडा किंवा रडारड यातच दंग आहेत आणि शासन-मग ते काँग्रेसचं असो





अनुक्रमणिका

वा युतीचं असो- भाषेबद्दल उदासीन आहे. जागतिक मराठी परिषद आणि राज्य मराठी विकास संस्था सुरू करून दिल्या आहेत. यावर संबंधितांनी खूश राहावं अशी शासनाची अपेक्षा आहे; पण म्हणून कंटाळून, उदास होऊन चालणार नाही. एक चार कलमी सकारात्मक कार्यक्रम लोकांच्या पुढे मांडण्याचं काम करायला हवं. लोकांना तो पटला तर ते शासनावर दबाव आणतील आणि या कार्यक्रमांच्या मागं लोकांची आणि शासनाची कार्यशक्ती उभी राहील. (केवळ शासनानं किंवा केवळ लोकांनी पार पाडण्याजोगे असे ते कार्यक्रम नाहीतच मुळी.)

१) राज्य मराठी विकास संस्थेला स्थापन होऊन आज सहा वर्षे पुरी होत आहेत: पण प्रत्यक्ष कामकाज सुरू व्हायला नंतर वर्ष-सव्वा वर्ष लागलं. तिला अजून स्वत:ची जागा नाही. किंबहुना अक्षरश: एका खोलीत तिचा संसार संचालक डॉ. सरोजिनी वैद्य आणि त्यांचे सहकारी काटकसरीनं, उत्साहानं आणि निष्ठेनं चालवीत आहेत. ही गोष्ट या मंडळींना भूषणावह असली, तरी ती शासनाला तितकीच दूषणावह आहे. भाषा, साहित्य, संस्कृती आणि भाषाविषयक तंत्रज्ञान हे चार विभाग अजूनही सुरू झालेले नाहीत. नियोजित चार उपसंचालक पदांपैकी एकच आणि तेही बऱ्याच उशिरा भरलं गेलं. सुसज्ज ग्रंथालय आणि यंत्रशाळा उपलब्ध नाहीत. मुद्रण प्रकाशनासाठी कशीबशी जुळवाजुळव करावी लागते. कमी आर्थिक तरतूद आणि कमी मनुष्यबळ वापरून जेवढी कामं हाती घेता येतील, तेवढीच हाती घेता येतात.

तर योजनेचं पहिलं कलम म्हणजे या सगळ्या उणिवा दूर करून संस्थेचं नियोजित कार्य अधिक जोमानं आणि विविध अंगांनी चालू करणं. (माझ्या 'वैखरी' पुस्तकातील 'राजभाषावर्षाचे एक फलित' या लेखात संकल्पित कामांचा तपशील दिला आहे.) लोक संस्थेकडून विविध अपेक्षा करत आहेत, हे ठीकच आहे; पण त्याबरोबर विविध प्रकारची मदत आणि प्रतिसाद लोकांकडून मिळायला हवा. संस्था शासनपुरस्कृत असली तरी ती स्वायत्त आहे. त्यामुळे, उदाहरणार्थ कुणी महाराष्ट्रीय उद्योजकानं यंत्रशाला उभारायला मदत केली तर ते हवंच आहे. शासनाचा पुरस्कार अधिक भरीव पाहिजे हे खरंच: पण त्यासाठी सर्वपक्षीय आमदार-खासदारांनी शासनावर दबाव आणला पाहिजे.

२) मराठी भाषकांचं वैचारिक-भावनिक पोषण होण्यासाठी आणि महाराष्ट्र

राज्याचा एकसंधपणा कायम राहण्यासाठी मराठी भाषेची गरज निश्चितच आहे. तशीच मराठी भाषकांची ज्ञानदृष्टी फाकण्यासाठी आणि राज्याबाहेरच्या विशेषतः भारताबाहेरच्या जगाशी आर्थिक, सांस्कृतिक, राजकीय संपर्कासाठी इंग्रजीवर किमान प्रभुत्व असण्याची गरज मराठी माणसाला आहे. इंग्रजीच्या किमान प्रभुत्वाबद्दलच्या भारतीयांच्या कल्पना फारच दरिद्री आहेत. परवाचीच गोष्ट घ्या. जॉर्ज फर्नांडिस यांनी सध्याचं केंद्रीय मंत्रिपद अनिच्छेनंच स्वीकारलं, त्याविषयी प्रसारमाध्यमांशी बोलताना ते बोलून गेले: 'आय एम रिझाइंड टू माय फेट.' त्यांना म्हणायचं होतं: आलिया भोगासी असावे सादर, अशी माझी स्थिती आहे. त्यांचा 'रिझाइंड' एवढाच शब्द पकडून एक वार्ताहर विचारता झाला: 'डू यू मीन यू आर गोइंग टू रिझाइन नाऊ?' (तुम्ही राजीनामा देणार का?) ('रेझिग्नेशन' शब्दाला 'राजीनामा, पदत्याग या अर्थाखेरीज 'परिस्थितिशरणता' असाही अर्थ असतो हे त्या वार्ताहराच्या गावी नव्हतं.) फर्नांडिसांनी कपाळाला हात लावला, यात नवल नाही. तो वार्ताहर मराठी भाषक नव्हता. अशी आपण आशा करू; पण आपल्याला इंग्रजी बऱ्यापैकी येतं असं समजणाऱ्या पुष्कळ मराठी भाषकांची स्थिती यापेक्षा फारशी निराळी नसते.

मराठीच्या भल्यासाठी बहुसंख्य मराठी माध्यमाच्या शाळांतून आणि काही इंग्रजी माध्यमाच्या शाळांतूनही इंग्रजीच्या अध्यापनाची जी परवड चाललेली आहे ती थांबायला पाहिजे. इंग्रजीच्या बऱ्याच शिक्षकांना स्वतःच इंग्रजी धड बोलता लिहिता येत नाही. तसं येत असलं तरी भाषेच्या अध्यापनाच्या आधुनिक पद्धती अवगत नसतात. तशा त्या अवगत असल्या तरी गर्दीच्या वर्गातून आणि तुटपुंज्या ग्रंथालयामुळे त्या अमलात आणता येत नाहीत. आपल्या शिक्षण महाविद्यालयांबद्दल काय बोलावं? समजा, आपल्या अभियांत्रिकी महाविद्यालयांनी डोळस आणि कल्पक अभियंते निर्माण करण्याऐवजी केवळ फिटर, मेकॅनिक, वायरमन, गवंडी तयार करण्यात आणि मोडीत निघालेलं तंत्रज्ञान प्रशिक्षणार्थींच्या गळी उतरवण्यात धन्यता मानली, तर आपण काय म्हणू ? आपण ती अभियांत्रिकी महाविद्यालयं मोडीत काढायला निघू. आपल्या शिक्षण महाविद्यालयांची स्थिती यापेक्षा फारशी वेगळी नाही. आता म्हणून ती मोडीत काढणं आततायीपणाचं होईल. आपण इंग्रजीच्या भावी शाळाशिक्षकांचं प्रशिक्षण करणाऱ्या मंडळींचं नव्यानं प्रशिक्षण करण्याची सोय करू आणि शिवाय इंग्रजीच्या विद्यमान शाळाशिक्षकांचंही नव्यानं प्रशिक्षण करण्याची सोय करू. अशी दुहेरी उपाययोजना नेटानं आणि मोठ्या प्रमाणावर केली, तर आपल्या शालेय इंग्रजीची दुरवस्था थांबेल आणि कुणी सांगावं इंग्रजी माध्यमाकडे वळणारा आजचा मुलांचा

लोंढा थांबला नाही तरी बराच कमी होईल.

तामिळनाडू, केरळ, कर्नाटक आणि आंध्र प्रदेश या चार दाक्षिणात्य राज्यांनी एकत्र येऊन काही वर्षांपूर्वी याच प्रश्नाला तोंड देण्यासाठी बंगळूरमध्ये रिजनल इन्स्टिट्यूट ऑव्ह इंग्लिश साऊथ या संस्थेची स्थापना केली. भरपूर आर्थिक तरतूद आणि उत्तम मनुष्यबळ त्यासाठी उभं केलं. आज त्या संस्थेत मलेशियासारखी इतर आशियाई राष्ट्रेसुद्धा आपले प्रशिक्षणार्थी पाठवायला उत्सुक आहेत. महाराष्ट्रानं काय केलं? स्टेट इन्स्टिट्यूट ऑव्ह इंग्लिश प्रथम मुंबईला स्थापन केली. नंतर ती औरंगाबादला नेली. आज त्या संस्थेचं अस्तित्वदेखील महाराष्ट्रातसुद्धा कुणाला माहीत नाही. त्याऐवजी रिजनल इन्स्टिट्यूट ऑव्ह इंग्लिश वेस्ट नावाची संस्था महाराष्ट्र, गुजरात, गोवा आणि मध्य प्रदेश या राज्यांच्या सहकार्यानं महाराष्ट्रात स्थापण्यात महाराष्ट्र राज्यानं पुढाकार घ्यावा, अशी कल्पना गेली कित्येक वर्षं मी महाराष्ट्र शासनापुढे मांडतो आहे. यासाठी संस्थेची तपशीलवार योजना करून देण्याची तयारीही दाखवली; पण कॉंग्रेसचं शासन काय किंवा युतीचं शासन काय- ढिम्म! तर नागरिकांनी आता आपल्या आमदार-खासदारांच्या मागं लागावं आणि हा विषय पक्षीय भूमिकेचा नसून, त्यांनी एकजुटीनं शासनाच्या मागं लागावं हे त्यांना पटवावं.

३) महाराष्ट्र राज्यामध्ये जो भारतीय राहतो तो महाराष्ट्रीय, मग त्याची जन्मभाषा मराठी असो नसो, त्याच्याबद्दल आपण भेदभाव करणार नाही, अशी उदार भूमिका मराठी जनतेनं आणि महाराष्ट्र शासनानं नेहमीच घेतलेली आहे. तिचा व्यत्यासही महत्त्वाचा आहे. महाराष्ट्रातील अ-मराठी भाषिकांनी इथं एकोप्यानं राहावं आणि मराठी भाषेवर किमान प्रभुत्व मिळवावं हे त्यांनीही मनापासून पटवून घ्यायला पाहिजे. त्यासाठी इंग्रजी, गुजराती इत्यादी अन्य माध्यमांच्या शाळांमधून मराठी शिकवणं आवश्यक ठरवलं गेलं; पण याही तरतुदीची परवड झाली आहे. भरीत भर म्हणजे इंग्रजी माध्यमाच्या शाळेतल्या मराठी जन्मभाषा असणाऱ्या मुलांना आणि अ-मराठी भाषिक मुलांना या बाबतीत एकाच मापानं मोजलं जातं, त्यामुळे तिथला तृतीय भाषा म्हणून योजलेला मराठीचा पाठ्यक्रम मराठी मुलांच्या दृष्टीनं सपक ठरतो, अ-मराठी भाषक मुलांच्या दृष्टीनं अवजड ठरतो.

यासाठी पहिली गोष्ट म्हणजे मराठी मुलांनी मराठी द्वितीय भाषा म्हणून शिकायची, तर अ-मराठी मुलांनी ती तृतीय भाषा म्हणून शिकायची अशी व्यवस्था करावी. (काही अ-मराठी पण मराठी वस्तीत वाढलेली अ-मराठी मुलं कदाचित हौसेनं मराठी द्वितीय भाषा म्हणून शिकायला तयार झाली, तर त्यांना ते करू द्यावं;

पण मराठी मुलांना मात्र मराठी तृतीय भाषा म्हणून घ्यायला प्रतिबंध करावा.) अर्थातच द्वितीय भाषा मराठी आणि तृतीय भाषा मराठी यासाठी अगदी वेगळा पाठ्यक्रम, वेगळी अध्यापन पद्धती आणि वेगळी पाठ्यपुस्तकं तयार करावी लागतील. उदाहरणार्थ- तृतीय मराठीत किमान भाषाप्रभुत्व, त्याचा रोजच्या व्यवहारात उपयोग आणि मराठी साहित्य आणि संस्कृतीचा अल्प परिचय यावर भर राहील, द्वितीय मराठीत मात्र ललित वाङ्मय आणि वैचारिक वाङ्मय वाचण्याची आवड निर्माण होणं आणि हळूहळू या आवडीचं रूपांतर निवड करण्याच्या क्षमतेमध्ये होणं यावर भर द्यावा लागेल.

याला पूरक दुसरी गोष्ट म्हणून मराठीच्या विद्यमान शिक्षकांचं नव्यानं प्रशिक्षण करावं लागेल आणि मराठीच्या भावी शिक्षकांसाठी आपल्या शिक्षण महाविद्यालयांतून मराठीचं स्वभाषा म्हणून अध्यापन आणि तिचं परभाषा म्हणून अध्यापन यासाठी वेगवेगळे पाठ्यक्रम आखावे लागतील. केंद्र सरकारच्या पुणे येथील पश्चिम विभागीय भाषा केंद्रात मराठी परभाषा म्हणून शिकण्यासाठी अ-मराठी शिक्षकांना प्रशिक्षित आणि उत्तेजित केलं जातं. त्या केंद्राचाही या कामी उपयोग करून घेता येईल. मुख्य म्हणजे कुणीही सोम्यागोम्यानं मराठी शिकवावं अशी अव्यवस्था राहायला नको.

४) मराठी माणसाच्या भाषिक गरजा नीट पुऱ्या व्हाव्यात, यासाठी आपण तीन उपाय सुचवले; परंतु जर हे उपाय प्रभावीपणे अमलात आणायचे असतील, तर आर्थिक तरतुदींबरोबर मोठ्या प्रमाणावर मनुष्यबळ उभं करावं लागेल हे उघड आहे. भाषाविज्ञानाशी केवळ परिचित नाही, तर त्या विषयात पारंगत असणारे आणि या ज्ञानाचा शिक्षण व्यवहारात म्हणा, अन्य व्यवहारात म्हणा (उदाहरणार्थ -परिभाषानिर्मिती, संगणकव्यवहार यांसारख्या क्षेत्रांतून) मोठ्या आत्मविश्वासानं आणि कल्पकतेनं उपयोग करू शकतील, अशा प्रशिक्षित लोकांची आपल्याला मुख्यत: गरज भासणार आहे.

वरवर समाधान मानायचं, तर महाराष्ट्रात एक सोडून तीन ठिकाणी भाषाविज्ञान प्रशिक्षणाची सोय आहे. डेकन कॉलेज, मुंबई विद्यापीठ आणि नागपूर विद्यापीठ; पण हे समाधान वरवरचं राहतं, कारण मराठी लोक आणि महाराष्ट्र शासन यांनी या विषयाकडे संपूर्णपणे पाठ फिरवलेली आहे. इंग्रजी, मराठी, संस्कृत, फ्रेंच इत्यादी भाषा शिकवणारी मंडळी भाषा विज्ञानाकडे अविश्वासानं, किंबहुना दुस्वासानं पाहात आली आहेत. ती या विषयापासून आपल्या विद्यार्थ्यांना परावृत्त करू पाहतात.

आपल्या नेहमीच्या अर्थभीरू वृत्तीनुसार आपले पालक पाल्याला भाषाविज्ञान विषय घ्यायला प्रतिबंध करतात. (परिणामी डेकन कॉलेजच्या भाषाविज्ञान विभागातून मराठी मुलांपेक्षा कन्नड, तेलगू, हिंदी, कश्मिरी, मणिपुरी, असमिया, नेपाळी, सिंहली, थाई इत्यादी अन्य भाषिक मुलंच जास्त प्रमाणात एम.ए. आणि पीएच. डी. करून गेली आणि अजूनही जात आहेत. आपापल्या जागी काम करताना ती डेकन कॉलेजचं नाव मोठ्या कृतज्ञतेनं घेतात.) यावर महाराष्ट्र शासन म्हणतं : मग भाषा विज्ञान विषयाला आम्ही काय म्हणून उत्तेजन द्यायचं आणि मग ते रिकामी पदं भरायलाही अडथळा करतं. मराठीच्या भाषावैज्ञानिक अभ्यासासाठी नवीन पद निर्माण करायला हात आखडता घेतं. (उदाहरणार्थ - मुंबई विद्यापीठात गेली काही वर्ष एक ओरिया भाषक लेक्चरर बिचारा सर्व विभागाची धुरा एकट्यानं पेलतो आहे.) वास्तविक बुद्धिमान महाराष्ट्रीय मुलांना आणि विद्यमान शालेय वा महाविद्यालयीन शिक्षकांना या विषयाकडे आकृष्ट करायला शासनानं विशेष शिष्यवृत्त्या ठेवायला पाहिजेत. रिकामी पदं भरायला उत्तेजन द्यायला पाहिजे. ग्रंथालय आणि यंत्रशाळा समृद्ध कशा राहतील, हे पाहायला पाहिजे. या तीन केंद्रांच्या साह्यानं अनुवाद विद्येचं प्रशिक्षण देणारे नवे पाठ्यक्रम सुरू करायला उत्तेजन द्यायला पाहिजे. थोडक्यात एके काळी भाषाविज्ञान या विषयात महाराष्ट्रानं भारतात, किंबहुना एशियात आघाडी मारली होती, हे स्थान डेकन कॉलेजला पुन्हा कसं मिळेल, इकडे लक्ष द्यायला पाहिजे.

मराठीचा विकास तो महाराष्ट्राचा विकास तो असा. थोडक्यात मी घोड्याला पाणी दाखवलं आहे. तो नाठाळ घोडा पाणी केव्हा पितो याची मनापासून वाट पाहत आहे. या वयात मी तरी दुसरं काय करणार?

**(सकाळ २४ एप्रिल १९९८ मधून साभार)**

□□□

**७, धनंजय, ७५९/८३ भांडारकर रस्ता गल्ली**

**पुणे ४११ ००४**

दखलपात्र

# माझा मराठाचि बोलू....'

ना. या. जोशी

सध्या वृत्तपत्रातून मराठीच्या महत्त्वाविषयी, महात्म्याविषयी आणि स्वाभिमानाविषयी बरीचशी चर्चा चालू असते. 'माझी मुले मराठी माध्यमातून शिकतात, तुमची...?' असे एक भित्तीपत्रकही पुष्कळ ठिकाणी आढळते. मराठीच्या पीछेहाटीविषयी वाटणारी ही खंत अयोग्य आहे असे कोण म्हणेल?

प्रतिवर्षी भरणाऱ्या अखिल भारतीय (म्हणजे नेमके काय? कोणास ठाऊक!) मराठी साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरूनही याविषयी जाण आणि खंत प्रकट होत असते. विश्वविद्यालयीन अभ्यासातील कला-शाखांतून संस्कृतचे तर पार उच्चाटन झाले आहे. मराठीही त्याच दिशेने वाटचाल करत आहे. पण ही खंत आजची नाही. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना इतिहासाचार्य राजवाड्यांनी हीच खंत 'मराठी भाषा मुमूक्षू आहे काय' म्हणून आणि माधव जूलियनांनी 'मराठी असे आमुची मायबोली जरी आज ती राजभाषा नसे' किंवा श्री. कृ. कोल्हटकरांनी 'वचनी' लेखनीही मराठी गिरा दिसो.' अशी आपली खंत व्यक्त केली. अगदी श्री ज्ञानेश्वरांची 'माझा मराठाचि बोलू कौतुके' किंवा श्री एकनाथांची 'संस्कृत काय देवे केली. प्राकृत काय चोरापासोनि आली?' या उक्ती काय दर्शवितात?

याचा अर्थ मराठीचा 'उदयोऽस्तु' 'उदयोऽस्तु' हा गर्जप प्रत्येक युगात करावा लागला. तसाच तो या युगातही होत आहे. याची मूलग्राही कारणे कुणी शोधली आहेत का? का केवळ एक चूष म्हणून हा उद्घोष करायचा?

प्रत्येक कालखंडाच्या गरजा निराळ्या असतात. बौद्ध कालापासून प्राकृत भाषांना व त्यामुळेच पुढे प्रादेशिक बोलींना महत्त्व येत गेले. ती काळाची गरज

होती. आमच्या त्या वेळचा समाज हा धर्म व अध्यात्म यांवर वैचारिकदृष्ट्या पोसला जात होता आणि ते वाङ्मय संस्कृतात होते. संस्कृत ही केवळ पंडितांनाच समजत होती. बहुजन समाजाला त्याच्या प्रादेशिक बोलीतून हे ज्ञान मिळावे, कळावे या इच्छेने ते प्रकट होणे आवश्यक होते, असे प्रतिपादन करण्यात येते. हा मुद्दा कितपत बरोबर आहे कुणास ठाऊक? 'त्या काळच्या सामान्य माणसाला ज्ञानेश्वरी खरोखरीच कळली व म्हणून तो भागवत सांप्रदायी झाला,' हे विधान तर्काच्या कसोटीवर टिकू शकेल, असे वाटत नाही.

श्री ज्ञानेश्वरांचे व एकनाथांचे अलौकिक जीवन आणि चमत्कारांची गुंफण या गोष्टी जरा बाजूला ठेवल्या तरी या प्रातःस्मरणीय विभूतींनी 'देव सोपा केला, आवाक्यात आणला,' हे महत्त्वाचे! असो, यावर गदारोळ उठू शकेल याची मला जाणीव आहे. मला सांगायची ती 'काळाची गरज'. धार्मिक विपत्तीच्या काळातून समाजाला प्रेष देण्यासाठी वाङ्मयाची मांडणी प्रादेशिक भाषेतून करणे आवश्यक होते. ती तशी झाली. अध्यात्म, धर्म, वेदांत इत्यादी साहित्य संस्कृतात तयार होते. त्यामुळे नव्या शब्दांची निर्मिती करण्याची गरज नव्हती. शब्द तयार होते. प्रतिमा मात्र निराळ्या निर्माण कराव्या लागल्या.

आजच्या समाजाला विशेषतः तरुण पिढीला मराठीचे आकर्षण का वाटत नाही? इंग्रजी माध्यमाच्या शाळा दुथडी भरून का वाहत आहेत? आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांत घालणारे सारेच पालक मराठीचे द्वेष्टे आणि इंग्रजीचे प्रेमी आहेत का? नवश्रीमंती हे एवढेच कारण आहे का? या गोष्टींचा सखोल अभ्यास होणे आवश्यक आहे.

आजच्या, काळाची उपयुक्त परिमाणे (Utility dimensions) बदलली आहेत. विज्ञान, गणित आणि तंत्रज्ञान यांच्या वाढीचा वेग एवढा प्रचंड आहे की त्यापुढे कोणतीही भाषा पुरी पडू शकत नाही. अगदी इंग्रजी सुद्धा! एकेक अक्षर त्या त्या



अनुक्रमणिका

ज्ञानशाखेत एक स्वतंत्र अर्थ घेऊन मिरवते. इंग्रजी लिपी पुरेना म्हणून अल्फा, बीटा, गॅमा, लॅमडा, ओमेगा अशी अन्य लिपीतील अक्षरेही वापरावी लागतात. पण ज्ञानलालसा असलेला समाज स्वाभिमानाची चुकीची कुंपणे घालून घेत नाही. तो समाज मिळेल तेथून एकाक्षर संकेत, शब्द, वाक्यप्रयोग उचलतो व वारुळाप्रमाणे कणा-कणाचे ज्ञान बांधत जातो. आम्ही मात्र भाषांतराचा व प्रतिशब्दांचा अतिरेकी हट्ट घेऊन बसलो आहोत.

असे विधान ऐकून येते की 'इंग्रजी भाषा, शब्दामागची अर्थसंकल्पना अचूक व्यक्त करू शकते,' हे विधान एक अर्धसत्य आहे. प्रत्यक्षात अचूक अर्थसंकल्पना व्यक्त करणारे शब्द वा चिन्ह त्यांनी निर्माण केले. आमच्याकडेही असा यशस्वी प्रयत्न संस्कृत भाषेत झाला आहे. अन्यथा एकाच घटकासाठी, घटनेसाठी इतके शब्द निघालेच नसते. उदाहरणार्थ, फूल या शब्दाला पुष्प, कुसुम, सुमन, माल्य इ. शब्द का निघाले? हे पर्याय नव्हेत, तर विशिष्ट अर्थच्छटा व्यक्त करण्यासाठी त्यांची गरज पडत होती. पण आमच्या साहित्यिकांनी (पूर्वीच्या आणि आजच्याही) या सर्व शब्दांचा उपयोग ढिसाळपणे आणि पर्यायवादी म्हणून केला! ज्याची माळ करता येते त्यालाच माल्य म्हटले पाहिजे. जे जमिनीवरील रोपट्याला येते, त्यालाच कुसुम म्हटले पाहिजे. हे भान साहित्यिकांनी राखले का?

समोर परिचित व्यक्ती दिसली आणि दुरूनच त्याला हात हालवून जाणीव दिली तर या क्रियेला नमस्कार म्हणावे काय? वाकून केला जाईल त्यालाच 'नमस्कार' (नम् म्हणजे **to Bend**) म्हणावे, अन्यथा अभिवादनच! शब्दांची परिपक्तवा, अचूकता, चपखलता आणि अर्थवाहिता यांचे भान साहित्यिकांनी कधी ठेवले का?

जोपर्यंत ललित लेखन आहे, यमक, अनुप्रास साधावयाचे आहे, शब्दांची कारंजी उडवायची आहेत तोवर ठीक, पण युग बदलले. विज्ञान आणि तंत्रज्ञान, गणिताच्या शाखा यांची वाढ होताच साहित्यिक भाषा थिटी पडू लागली. विज्ञानात

नेमकेपणाला अतिशय महत्त्व आहे. उदा. 'Air, weather' आणि Climate या तीनही परिभाषिक शब्दांचा अर्थ अतिशय निश्चित आहे. आमच्याजवळ मात्र दोनच शब्द आहेत. हवा आणि हवामान

कुणी म्हणेल पर्याय शोधा. भाषा संचालनालयाने तयार केलेला भौतिकशास्त्र परिभाषा कोश पाहू. पृष्ठ ९ वर Air शब्दाचा अर्थ हवा, वात दिला आहे. Climate शब्द दिलाच नाही व पृष्ठ ३६३ वर वेदरला हवामान आणि हवा हे शब्द दिले आहेत, आहे की नाही गंमत? बडी बडी मंडळी, सारी विद्यापीठातील Air लाही हवा आणि Weather लाही हवा म्हणत असतील तर यापरते दुर्दैव ते कोणते? हिंदी विज्ञान शब्दावली मात्र हवा, हवामान व ऋतुमान असे तीन शब्द देते, मराठीच्या अभिमान्यांना (?) मात्र ऋतुमान शब्द खटकतो हे चर्चेच्या वेळी जाणवते.

काम आणि कार्य यांत मराठी साहित्यिकांना काय फरक जाणवेल? Work, Power, Function, Energy अशा विशिष्ट संकल्पनांसाठी आमची शब्दसंपत्ती अपुरी पडते. शक्ती हा शब्द म्हणे कठीण! त्याऐवजी कुवत हा सोपा शब्द वापरा. या सोपेपणाच्या नावाखाली ज्ञानाचा बळी जाईल. काम या शब्दाचा इतिहास मोठा पाहण्यासारखा आहे. त्याच्या जन्मदात्या संस्कृत भाषेने त्याला दिलेले अर्थ आणि आम्ही त्याचे उपयोगात आणीत असलेले अर्थ यांच्यात काही ताळमेळ आहे का? सरकारी भौतिकशास्त्र परिभाषा कोशात Function ला फल आणि कार्य (पृष्ठ १२७) व पृष्ठ ३६६ वर Work ला कार्य हे अर्थ दिले आहेत. समजा कार्य हा शब्द मराठी विज्ञानात वापरला तर काय समजावे? Function की Work? उत्तर 'संदर्भावरून समजून घ्या.' Difference = भिन्नता, Distance = अंतर, पण Energy difference ला मात्र ऊर्जा अंतर! इतका ढिसाळ बेढबपणा विज्ञानात चालणार नाही, गणितात चालणार नाही. इलेक्ट्रॉनला वीजाणू (विजेचा अणू ?) कितपत योग्य आहे?

काही शब्दांना योग्य ते पर्याय सापडणे सहज शक्य आहे. पण प्रचंड वेगाने

वाढणाऱ्या ज्ञानशाखांना आपण कसे पुरे पडणार? विज्ञान आणि गणित यांतील अचूकपणा व निश्चितार्थ बोधकता याला पर्यायी शब्द वापरताच येणार नाहीत. पण आपला सुशिक्षित म्हणवणारा समाज त्याचा विचार करताना दिसतच नाही. उदाहरणार्थ, 'दिवस' हा शब्द घ्या. त्याचा निश्चित अर्थ काय? आपट्यांच्या शब्दकोशात त्याचा अर्थ A Day असा दिला आहे. तर दिन शब्दाचा अर्थ Day (Opposite रात्री) असा देऊन लगेच A Day (including the night) असा विरुद्धार्थी आणि अहन = A Day (including day and night) पंडित सूर्यकांत यांच्या शब्दकोशात अह = दिन day, तर दिन = day, आणि दिवस = दिन, day असे अर्थ दिले आहेत. साहित्यात (किंवा काव्यात) खालील कोणताही शब्द वापरला तर चालेल. पण विज्ञानात तो तसा वापरता येणार नाही. कारण सूर्योदय ते सूर्योदय, सूर्योदय ते सूर्यास्त, सूर्यास्त ते सूर्योदय या कल्पनांना विज्ञानात आणि भूगोलात निश्चित अर्थ दिल्याशिवाय त्यांचे पाऊल पुढे पडणे अशक्यच.

वास्तविक भारतीय ज्योतिषशास्त्राला हा प्रश्न पडला होता व त्यांनी तो सोडवलाही आहे. पंचांगातून दिनमान (सूर्योदय ते सूर्यास्त) हा शब्द वापरून त्यांनी हा अर्थ निश्चित केला आहे. पण हा आग्रह धरून तो टिकवला नाही. दिन ऐवजी दिवस, अह असेही शब्द त्यांनी वापरले, दिवस हा शब्द कोणत्या अर्थाने वापरावा? सूर्यप्रकाश असलेल्या काळापुरताच तो वापरता येणार नाही हे उघड आहे. सूर्यप्रकाश असेपर्यंतच्या (सूर्यादय ते सूर्यास्त) काळाला दिन असा शब्द वापरावा, जरी आपट्यांच्या शब्दकोशात (दिन = १) Day (Opposite to रात्री) आणि २) a day (including night) असा एकाच वेळी विरुद्ध अर्थ दिला असला तरी! दिवस हा शब्द या संकल्पनेसाठी वापरता येणार नाही. नाहीतर पुढे घोटाळे होतील. मग 'वर्ष ३६५ दिवसांचे असते' या प्रयोगाला अर्थ उरणार नाही. कारण वर्षात ३६५ दिन व ३६५ रात्री मिळून वर्षाचे ३६५ दिवस होतात हे स्पष्ट होणार नाही. बरे, याबाबतीत इंग्रजी भाषेची





अनुक्रमणिका

स्थितीही फारशी वाखाणण्याजोगी नाही. Day = (1) Time While Sun is above horizon (loosely) including twillight आणि लगेच (2) Twenty Four hours from noon (Concise Oxford Dictionary) तर Day = The period of the earth's rotation on its axis म्हणजे २४ तास (Dictionary of Astronomy. Edited by llingworth)

वर काही सर्वपरिचित कल्पना आणि शब्दांचा उहापोह केला आहे. पण तेवढ्याने भागत नाही. एखाद्या शास्त्रज्ञाच्या नावावर एखादे एकक मानले आहे. उदा. ओहम (Ohm) त्यासाठी फारतर आपण तेच नाव स्वीकारू. कारण त्या विशेषनामाचे भाषांतर करता येत नाही. पण त्याच युनिटचा व्युत्क्रम जेव्हा mho म्हणून वापरला जातो तेव्हा होणारी कुचंबणा कशी टळणार? शिवाय परिमाणांसाठी विशिष्ट खुणा वापरल्या जातात. उदा. ओहमसाठी वरो, ओमेगा, अल्फा, फोटॉज अशा कितीतरी संकल्पनांसाठी चिन्हे वापरली जातात व त्या चिन्हांचे आंतरराष्ट्रीय एकरूप संकेत आता ठरून गेले आहेत.

इंग्रजीसारख्या भाषेने हे सारे स्वीकारले. त्यांनी संकल्पना यथार्थपणे व्यक्त करण्यासाठी अन्य भाषांचा आणि लिप्यंतरांचा सर्रास उपयोग केला. आम्ही मात्र विज्ञान मराठीतून शिकवावे असा हट्ट धरून बसलो! अर्थात मी त्याबाबतीत बऱ्याच अंशी सहमत आहे. मला फक्त म्हणायचे ते एवढेच की प्रत्येक शब्दासाठी मराठी प्रतिशब्द तयार करण्याचा हव्यास नको. सहजसुलभ पण अर्थाला अचूक असणारे पर्याय शब्द किंवा भाषांतरित शब्द जरूर वापरावेत. ऑक्सिजनला ऑक्सिजनच म्हणावे. प्राणवायू म्हणू नये. कारण प्राणवायू हा एकूण प्राण, अपान, उदान, व्यान, समान या पाच वायूंपैकी एक आहे. ऑक्सिजनची संकल्पना येथे जुळत नाही. केवळ एखादा शब्द रूढ झाला म्हणून तो स्वीकारायचा. तो सोपा आहे म्हणून स्वीकारायचा या भूमिकेला मुळीच अर्थ नाही.

आमच्या भाषांनी आजपर्यंत ज्या ज्ञानशाखा हाताळल्या त्या आमच्याच होत्या. अध्यात्म, तर्क, न्याय, मीमांसा, काव्य, नाटक यासाठी त्यांना हा प्रश्न आला नाही. शब्दांची मोडतोड, निरंकुशः कवयः म्हणून खपली. पण विज्ञानासाठी, आजवर आपल्या भाषा कधी वापरल्या गेल्या नाहीत. म्हणून वैज्ञानिक लेखनासाठी आता आपली भाषा आपण वापरली पाहिजे नाहीपेक्षा केवळ घोषणांनी, ठरावांनी वा भित्तिपत्रकांनी काहीच साधणार नाही. वास्तविक पूर्वीच्या संस्कृतज्ञांनी शाळा-कॉलेजातून संस्कृत नाट्य, काव्य, व्याकरणच फक्त शिकवले. त्यातलेच उतारे अभ्यासाला ठेवले. या संस्कृत वेच्यांमध्ये कधी ज्योतिष, तर्क, वैद्यक (वनस्पती, औषधे, शल्यकर्म), राज्यशास्त्र यांचा समावेश झालाच नाही. साहजिकच संस्कृतात कथा, काव्य, नाटक आणि व्याकरण या पलीकडे साहित्यच नाही, असा गैरसमज निर्माण झाला. वास्तविक संस्कृतात अनेकविध शास्त्रीय रचना आहेत. पण नेणत्यांनी जाणत्यांवर कधीच मात केली!

ज्या वेळी आमच्या भाषेत तोलामोलाचे वैज्ञानिक निर्माण होतील आणि ते त्यांचे शोधसंशोधन स्वतःच्या भाषेत लिहितील त्या वेळी सारे जग तुमची मराठीही शिकेल, हे दिवास्वप्न नव्हे. श्री. शं. बा. दीक्षित लिखित 'भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास' मुळातून वाचण्यासाठी काही पाश्चात्त्य विद्वान मराठी शिकले आणि श्री गौरीशंकर हिराचंद ओझा यांचा 'भारतीय लिपिमाला' हा हिंदी ग्रंथ वाचण्यासाठी पाश्चात्त्य विद्वान हिंदीही शिकले. संस्कृतबद्दल तर बोलायलाच नको,अनेक पाश्चात्त्य विद्वान संस्कृत शिकले. हीच परिस्थिती भविष्यकाळात यायची तर जगाने स्तिमित व्हावे असे शास्त्रीय साहित्य या समाजाने निर्माण करावे. जोशी इफेक्ट, रामन इफेक्ट नाही का जगाने घेतले? केवळ विश्वविद्यालयीन किंवा महाविद्यालयीन प्राध्यापकांना शिकवण्यासाठी विद्यार्थी मिळत नाहीत म्हणून मराठी असावी काय? याचा जरा अंतर्मुख होऊन विचार नको का करायला?

□□□





अनुक्रमणिका

# शुद्धलेखनविषयक एक सुखद स्मृती

हेमंत वि. इनामदार

पुण्यातील श्री. ना. दा. ठाकरसी महिला महाविद्यालयात १९५४ ते १९८५ अशी एकतीस वर्षे मी मराठीचे अध्यापन केले. श्री. गं. बा. सरदार हे त्या संस्थेत १९४१ ते १९६८ या कालावधीत मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करीत होते. १९५४ ते १९६८ अशी चौदा वर्षे त्यांच्या मार्गदर्शनाखाली काम करण्याची संधी मला मिळाली. शैक्षणिक मूल्यांविषयीची तळमळ आणि वैचारिक सचोटी या सरदारांच्या गुणांचा प्रत्यय या कालावधीत मला अनेकदा आला.

- या संदर्भातील एक आठवण नमूद करण्याजोगी आहे. मराठी साहित्य महामंडळाच्या लेखनविषयक नियमांना सप्टेंबर १९६२ मध्ये महाराष्ट्र शासनाने मान्यता दिली होती. या नियमांप्रमाणेच लेखन करावे, असा आदेश सर्व शिक्षणसंस्थांना जारी करण्यात आला होता.

जानेवारी १९६३ मध्ये महाविद्यालयाचे नियतकालिक प्रसिद्ध व्हायचे होते; त्यासाठी 'तिची कुत्री' या नावांची, एका विद्यार्थिनीने लिहिलेली गोष्ट छापायची होती. सरदार मुख्य संपादक होते. मी त्यांचा मदतनीस होतो. गोष्ट कुत्रीच्या अनेक पिलांविषयी होती. लेखिकेला एक (स्त्रीलिंगी) 'कुत्री' अभिप्रेत नव्हती. 'तें कुत्रें, तीं कुत्रीं' (नपुंसकलिंगी) अशी अनेक 'कुत्री' गोष्टीमध्ये लेखिकेने वर्णिली होती. महामंडळाच्या नव्या नियमाप्रमाणे अनुस्वार न द्यावेत, तर गोष्टीच्या मथळ्यावरून एका स्त्रीलिंगी कुत्रीची ती गोष्ट ठरत होती. त्यामुळे त्या गोष्टीचा आशय बदलत होता. सरदारांनी व मी चर्चा केली. छापलेल्या प्रुफांमध्ये, मथळ्याच्या ठिकाणी व मजकुरातील योग्य जागी अनुस्वार दिले. मुद्रणादेश देऊन तो फॉर्म आम्ही मुद्रणालयाकडे पाठविला.

त्या दिवशी रात्री दहा वाजता सरदार माझ्या घरी आले. रा. श्री. जोग आणि वा. दा. गोखले यांच्याशी चर्चा करून ते आले होते. नव्या नियमाप्रमाणे अनुस्वार देता येत नाहीत, एक-दोन परिच्छेद वाचून झाल्यावर वाचकाला योग्य तो संदर्भ समजेल; असा निर्णय त्या दोघांनी दिला होता.

सरदारांच्या इच्छेप्रमाणे ते आणि मी दोघेही मुद्रणालयात गेलो. मालकांना जागे केले. त्यांनी मशीनवरून संबंधित फॉर्म काढून आमच्या हाती दिला. अनुस्वार काढून टाकून आम्ही दुरुस्ती केली. सरदारांना त्यांच्या घरी पोहचवून मी रात्री बारा

वाजता माझ्या घरी परत आलो.

दुसऱ्या दिवशी दुपारी महाविद्यालयात आमची भेट झाली. काहीतरी निमित्ताने बोलणे निघाले. मी त्यांना म्हणालो, ''अण्णासाहेब, काल रात्री आपण उगीच त्रास घेतला. गोष्ट एका विद्यार्थिनीची होती. एवढ्या बारकाईनं कोण वाचणार? अनुस्वारांची चूक राहून गेली असती, तर काय बिघडलं असतं?'' त्यावर सरदार म्हणाले, ''खरं आहे. तुम्हाला विनाकारण त्रास झाला.''

सरदार वर्गावर गेले. मी ग्रंथालयात गेलो. आपण त्यांना असे बोलायला नको होते, हे माझ्या मनात आले. पण त्या तरुण वयातली माझी अस्मिता मोठी होती. मी गप्प राहिलो. पण दुसऱ्या दिवशी सकाळी सरदार माझ्या घरी आले. त्यांनी चहा घेतला. गप्पागोष्टी झाल्या. शुद्धलेखनाचा विषय निघाला नाही. तासाभराने ते घरी गेले.

चार दिवसांनी मी सरदारांना म्हणालो, ''तुम्ही माझ्याकडं चहा घेऊन गेलात त्यामागची 'सामाजिक फलश्रुती' माझ्या ध्यानात आली!''

त्यावर सरदार मोकळेपणाने हसले. ते म्हणाले, ''अहो, एक्केचाळीस साली मी आपल्या महाविद्यालयात नव्यानं नोकरीला लागलो, तेव्हा मीही तात्यांना (वामन मल्हारांना) काही किरकोळ प्रश्नावरून छेडलं होतं. तात्यांनी दिलगिरी व्यक्त केली होती. दुसऱ्या दिवशी सकाळी ते माझ्याकडं चहाला आले होते. तेव्हा त्यांनी घालून दिलेला पाठ मी गिरवला, इतकंच काय ते!''

''आता शुद्धलेखनाच्या प्रश्नाकडं वळू या - 'गोष्टीत कसलं आलंय शुद्धलेखन', असा तुमचा मुद्दा होता. आपण असं धरून चालू की, तो अंक छापून झाला नाही किंवा वर्गात त्याच्या प्रती वाटल्या नाहीत. तरीही आपल्या सहीनं आपण जे मंजूर करतो, ते आपल्या कल्पनेप्रमाणं निर्दोष असायला हवं. त्यातूनही त्यात चूक राहू शकेल, कारण आपण स्वत:च अपूर्ण असतो. पण आपण जे मान्य करतो, ते परिपूर्ण होण्यासाठी आपण प्रयत्न केलाच पाहिजे. एक कल्पनानिमित तज्ज्ञ सतत आपल्या डोळ्यांसमोर असला पाहिजे. त्याचा नैतिक धाक आपल्याला वाटला पाहिजे.''

- हा अनुभव लहानसा होता; पण तो मला बरेच काही शिकवून गेला!

□□□

**११, मंगेश पार्क, सर्व्हे नं. ३८/१ अ, एरंडवणे,**
**पुणे - ४११ ०३८ (दूरभाष ३६ ३५ ५९)**

# भवभूतीसंबंधी काही नवीन

**डॉ. पंडित आवळीकर**

भवभूती म्हणजे काव्यातील एक श्रेष्ठ अनुभूती आणि अभिव्यक्ती. केवळ संस्कृतमधील नव्हे. केवळ भारतातील नव्हें; तर जागतिक काव्यातील सुद्धा. साक्षात करुणरसानेसुद्धा अश्रू ढाळावेत हे त्याचे सामर्थ्य विशेषतः 'उत्तर रामचरिता'त प्रकट होते. 'उत्तरे रामचरिते भवभूतिर्विशिष्यते' हे सुभाषित या सत्याची साक्ष द्यावयास पुरेसे आहे.

इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या अखेरीस आणि आठव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेलेल्या या कवीचे नाव, गाव कोणते यासंबंधीचे प्रश्न अजूनही अनिर्णितच आहेत. भवभूतीने स्वतःसंबंधी दिलेली चरित्रपर माहिती अत्यल्प आहे आणि त्यामुळे या विषयातील 'अखेरचा शब्द' इतकी शतके उलटूनही (किंबहुना उलटल्यामुळेही) अशक्यप्रायच आहे.

अशा परिस्थितीत उपलब्ध, नवोपलब्ध अशी काही सामग्री पुनः पुन्हा तपासण्याचे, मांडण्याचे प्रयत्न परिश्रमपूर्वक केले पाहिजेत. असा एक अलीकडचा प्रयत्न म्हणजे डॉ. मो. गो धडफळे यांचा 'द्राविडो भवभूतिः हा शोध निबंध.[१]

निबंध संस्कृतमध्ये आहे. पण सुबोध आहे. सुगम आहे. 'द्राविडो भवभूतिः' या शीर्षकातून धडफळे यांचे प्रतिपाद्य सुस्पष्ट होते. भवभूती हा विदर्भातील - म्हणजे महाराष्ट्रीय असा डॉ. रा. गो. भांडारकर, डॉ. वा. वि. मिराशी यांचा शोध आहे. चांदा (चंद्रपूर) की आमगावनजीकचे गाव यांबाबत त्या दोघांत मतभेद आहेत. डॉ. श्री. कृ. बेलवलकरांना जुन्यात जुन्या 'मालती माधव'च्या हस्तलिखितात प्रस्तावनेमध्ये 'विदर्भेषु' हा पाठ नाही या कारणासाठी विदर्भ-पक्ष नाकारावासा वाटत नाही. पद्मावती असो अगर दंडकारण्य असो त्यांच्या वर्णनावरून ते स्थळ हे भवभूतीचे जन्मस्थान ठरविण्याचा बेलवलकरांनी उपहास केला आहे. परंतु नवीन पुरावा मिळेपर्यंत विदर्भाला भवभूतीची जन्मभूमी मानायची तयारी दाखवली आहे.[२] चांद्याप्रमाणे

---

१. मो. गो. धडफळे,'संस्कृत प्रतिभा',विंशउन्मेषः, द्वितीयविलासः, साहित्य अकादमी, पृ. १३०-१३१.

2. UTTARA - RAMA - CHARITA (Ed) Shripad Krishna Belwalkar Part-I Intoduction and Translation, Harward University Press, 1915, P. XXXVI and XXXVII.

दंडकारण्यही त्याची जन्मभूमी असण्याची शक्यता सुचवण्यात भांडारकरांची भूमिका जशी डळमळीत आहे तशीच बेलवलकरांचीही 'विदर्भेषु' या पाठाबाबत आहे.

'दक्षिणापथे' हेच पद प्रमाण मानून त्याचा दक्षिण भारत हाच अर्थ स्वीकारणे सत्याच्या जवळ नेणारे आहे. भवभूतीचे 'पद्मपूर' दक्षिणेत - द्राविड देशात, म्हणजे आजच्या कर्नाटक, आंध्र, तामिळनाडू आणि केरळ राज्यात शोधणे तर्कसंगत आहे आणि भवभूतीच्या नावात, गावात, भाषेत, अन्यवस्तू / व्यक्तिसंदर्भात द्राविडी विशेष पाहणे अगत्याचे आहे. अर्थात ही द्राविड-विशेषज्ञता धडफळे यांच्यापूर्वी घनश्याम या 'उत्तररामचरिता' वर टीका लिहिणाऱ्या मर्मज्ञाने प्रकट केली. तो तंजावरचा, बहुभाषिक. मराठीबरोबरच द्राविडी भाषा, वाक्प्रयोग, रीतिरिवाज यांचा जाणकार शिवाय संस्कृत पंडितही. भवभूतीतील 'द्राविडत्व' सर्वप्रथम पाहण्याचा आणि सांगण्याचा मान घनश्यामाचा.[३] 'उत्तर रामचरिता'तील तीन ठिकाणी भवभूतीने आपले 'द्राविडत्व' प्रकट केले आहे असा घनश्यामाचा अभिप्राय आहे. 'हन्त मातर्जीवामि' या वासंतीच्या उद्गारांवर (अंक २, श्लोक ७ नंतर)[४] ... 'इदानीं वत्सयोः पितुः' या सीतेने केलेल्या पतीच्या निर्देशावर (अंक ३, श्लोक १६ नंतर)[५] घनश्यामाने केलेली टीका डॉ. पां. वा. काणे यांचा अपवाद वगळता बहुतेक अभ्यासकांनी अनुल्लेखाने टाळली किंवा मोडीत काढली. भवभूती हा द्रविड देशाशी आणि तिथल्या वाग्विशेषांशी परिचित असण्याची किंवा तेथे काही वर्षे निदान राहिला असण्याची शक्यता काणे यांनी विद्वानांच्या दृष्टीस आणली आहे.[६] चिं. रा. देवधर, न. गो. सुरू यांनी 'मालतीमाधव' च्या प्रस्तावनेत (पृ. ५) घनश्यामाने दिलेल्या उदाहरणांत खास द्राविडी (Peculiarly Dravidian) असे काही नाही असा निर्वाळा दिला आहे. पण हा निर्वाळा देण्याचा त्यांचा अधिकार स्पष्ट झालेला नाही. द्राविडी प्रदेश, भाषा, लोक इत्यादींशी सुपरिचित असणारा डॉ. के. कृष्णमूर्तीसारखा अभिज्ञ 'उत्तररामचरिता'च्या आपल्या कन्नड आवृत्तीत या विषयाबद्दल मौन पाळतो याचे मला सखेदाश्चर्य वाटते.

---

३. जन्म इ. स. १७०० तुकोजी भोसले (१७२८-३५) यांच्या राजवटीत मंत्री.

४. द्रविड स्त्री स्वभावोक्तिः । एवं वदता कविना निजं द्राविडत्वं प्रकटितमित्यूह्यम्।

५. वत्सयोः कुशलवयोः । पितुः निजभर्तुः रामस्येत्यर्थ : । एतेन कविना निजं द्रविडत्वा माविष्कृतमिति बोध्यम ।

6. Vttara-Rama-charita (ed.) P.V. kane & C. N. Joshi

घनश्यामाने नोंदवलेले तिसरे द्राविडी स्थळ निर्विवादपणे भवभूतीचे 'द्राविडत्व' सुचवते असे मला वाटते. हे स्थळ म्हणजे ६ व्या अंकातील २७ वा श्लोक. त्यातील हा चरण- 'अकुंकुमकलंकितोज्ज्वल कपोलमुत्प्रेक्ष्यते.'

'अकुंकुमकलंकित' या पदावरील घनश्यामाचे भाष्य त्याच्या रसिकतेचे आणि निरीक्षणशक्तीचे द्योतक आहे. 'अकुंकुमकलंकितोज्ज्वल कपोल'च्या स्पष्टीकरणानंतर घनश्याम 'रंगविशेषः' असा शब्द वापरून त्याला '''पच्चे' इति द्राविडाः'' या भाष्याची जोड देतो. एम्. आर्. काळे आपल्या संपादित आवृत्तीत घनश्यामाचा प्रसंगोपात् उल्लेख करतात. पण 'पच्चे' हे सौंदर्यस्थळ त्यांनाच काय पण घनश्यामाची संपूर्ण टीका आपल्या आवृत्तीत देण्याऱ्या काणे यांना पण आकृष्ट करू शकलेले नाही.

धडफळे यांना 'कलंकित' मधील 'कलंक' आणि त्यातील घनश्यामाने सुचविलेला 'रंगविशेष'/ 'पच्चे' हा आशय कळला आणि त्यांनी तो समर्थपणे उकलून दाखवला हे भवभूतीच्या 'द्राविडत्वा'चे मौलिक आकलन होय. धडफळे यांच्या शोधनिबंधातील पुढील उतारा म्हणजे घनश्यामाच्या वाटेवरील 'पुढचे पाऊल' आहे: ''पच्चे नाम किश्चिद्धरिद्वर्णकं रसायन यत् स्त्रियो ललाटकपोलहस्तादिष्वयवेषु यावज्जीवं धारयन्ति । अस्य रसायनस्याश्चोतंन करणीयमस्ति । तुलसीदलाद्याकृतिश्च पत्युर्नाम चानेन विधिना नित्यसम्पन्नं भवति ।''[७] 'पच्चे'/ 'हच्चे' या कन्नड / तमिळ शब्दांचा अर्थ 'हिरवा / हिरवेपणा' या बरोबरच 'गोंदण' असाही रे. किटेल[८] आणि डॉ. शिवराम कारंत[९] यांनी दिला आहे.

'गोंदण' हा द्राविड (स्त्रीणां) आचार आहे आणि 'कलंक' या शब्दातून द्राविडी भवभूती 'गोंदण' नावाचा 'हिरवा डाग' सीतेच्या गालावर असल्याचे सुचवितो. घनश्यामाच्या आधारे धडफळे यांनी 'उत्तररामचरिता'तील सौंदर्यस्थळांत हिरवा हिरवागार 'गालि'चा भर म्हणून टाकली आहे. धडफळे यांनी स्वतंत्ररीत्या पूर्वसूरींच्या ध्यानी-मनी-स्वप्नीही न आलेले भवभूतीचे एक वादातीत 'द्रविडत्व' सांगितले आहे. हे अन्य कोणीही- घनश्यामाने सुद्धा सांगितल्याचे माझ्या पाहण्या-ऐकण्यात नाही.

---

७. पूर्वोक्त, संस्कृतप्रतिभा P. 137

8. Kannada - English Dictionary, (Ed.) Rev. Kittel, 1894, P. 921; Any figure punkctured or tattoed into the skin'. 'Greenness, green'

९. सिरिगन्नड अर्थकोश, (सं) शिवराम कारंत पृ.





अनुक्रमणिका

द्राविडी भाषेत थोरले काका आणि धाकटे काका यांना थोरले वडील आणि धाकटे वडील[१०] असे नातेवाचक शब्द आहेत. मल्याळममध्ये 'वेल्यप्प-एळेयप्प' हे या अर्थाचे शब्द आजही प्रचारात आहेत. चंद्रकेत लवाला रामाची ओळख करून देताना म्हणतो: ''ननु ज्येष्ठतात पादा इत्यवेहि'' (अंक ६). वाल्मिकी लवकुशांना लक्ष्मणाचा परिचय करून देतात. ''एष लक्ष्मण: कनिष्ठतात:।'' (अंक ७) ज्येष्ठतात आणि कनिष्ठतात हे नातेवाचक शब्द द्राविडी वळणाचे आहेत. मल्याळम् शब्दांची ती भवभूतिकृत अक्षरश: भाषांतरे आहेत. (अलीकडेच कन्नड शिकलेल्या धडफळे यांनी कन्नडच्या आधारे घेतलेली ही झेप व्यक्तिश: मला आनंददायक आणि आश्वासक वाटते.) भवभूतिविषयक संशोधनातील ही महत्त्वाची भर आणि दिशा आहे. त्याच्या केरळीयत्वाचा हा एक पुरावा आहे. धडफळे भवभूतीला द्राविड मानतात. त्यातही त्याला कार्णाट (कन्नडिग) मानतात. भवभूतीच्या 'श्रीकंठ' आणि भवभूती या नावांची चर्चा करताना कन्नड भाषेतील (?) म्हणून 'सिरिकंठय्य' हे नाव ते उद्धृत करतात.[११] 'भवभूति' या आई वडिलांनी नव्हे-लोकांनी ठेवलेल्या नावामध्ये 'भूति म्हणजे विभूति', 'भस्म', 'बूदि' म्हणजे राख. राख आणि भस्म यांतील फरक दृष्टीआड करण्यासारखा नाही. तसेच सर्वत्रच महाप्राणलोपाची प्रवृत्ती कन्नडमध्ये आहे असे मानून 'श्रीकंठय्य' चा 'सिरिकंटय्य' आणि 'भवभूति'चा 'बवबूदि' बनवणे वास्तवापेक्षा कल्पिताजवळ जाईल.

भवभूतीच्या नावाला कन्नडसदृश परिवेष देताना त्याच्या 'डंबर' (?) या कुलनामाचा संबंध धडफळे 'डंबळ' या कर्नाटकातील ग्रामनामाशी जोडतात. धारवाड जिल्ह्यात मुंडर्गीच्या रस्त्यावर 'डंबळ' हे गाव आहे. उदुंबर > उडुंबर > डुंबर > डंबळ असा प्रवास करीत आपण 'डंबळ' येथे पोचलो तर काय होईल? पुन्हा उलटा प्रवास 'डंबळ' ते 'डंबर' (किंवा 'उदुंबर' पर्यंत) करता येईल. पण भवभूती आणि त्याचे पूर्वज वा वंशज, त्याच्या कृतींतील निसर्ग-स्मृति-चित्रे यांपैकी कशाचे पुसटचे दर्शन 'डंबळ' मध्ये वा आसपास घडेल असे वाटत नाही.

---

१०. दोड्डप्प-चिक्कप्प (कन्नड), पेरियप्प- शित्तप्प (तामिळ), व्यवहार कोश, (सं.) वि. न. नरवणे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. १९८५, पृ. ९३

११. 'श्रीकंठय्य' हे नाव कर्नाटकात - कन्नड साहित्यात बी. एम्. श्री. आणि ति. नं. श्री' यांच्यामुळे अनेकांच्या जिव्हेवर आहे. भवभूतीच्या 'श्रीकंठ' या संस्कृत नावाचे त्याच्याच (?) काळात 'सिरिकंठय्य' होणे शक्य असले तरी अपरिहार्य नाही.

मी स्वत: मराठीतील एका महाकवीला - मुक्तेश्वराला डंबळ येथील मानून तीन तपांपूर्वीच 'कल्पनाविलासा'साठी पुष्कळ प्रसिद्ध झालो आहे.[१२] डंबळ येथे 'दोड्डुबसप्पा' बरोबरच 'कालेश्वर' आणि 'सोमेश्वर' ही मंदिरे आहेत. त्यांच्यात 'कालप्रियानाथ' शोधणेही शक्य नाही. कारण ती ११ व्या, १२ व्या शतकातील देवळे आहेत. या गावाचे नावही भवभूतीच्या आणि त्याच्या पूर्वजांच्या काळात 'डंबळ' नव्हते. 'धर्मपुर' किंवा 'धर्मपोळल्' असे होते.

त्यामुळे सद्य:स्थितीत तरी 'डंबळ' हे भवभूतीचे गाव होते किंवा आडनाव होते असे मानता येणार नाही. त्याच्या नावागावाच्या शोधासाठी कर्नाटकाच्याही खाली- शेजारी-पाजारी 'दक्षिणेत' जावे लागेल.

धडफळे यांनी भवभूतीचे द्राविडत्व - खरे तर कर्नाटकत्व, सुचवणारे 'पंपा' (हंपा, हंपी), शृगवेरपुरं (शृंगेरी), 'पद्मपुर' (तावरेकेरि) असे स्थळोल्लेख सादर केले आहेत. रामकथेतील स्थळे म्हणून ज्यांच्या उल्लेख होतो, त्यांचा संबंध कवीच्या वास्तव्यस्थानांशी जोडणे तर्कदुष्ट आहे. 'पंपा' हे कर्नाटकातील असले तरी राम (रामायण) संबद्ध स्थळ आहे. त्यातून कवीचे द्राविडत्व (वा कर्नाटकत्व (सं) सूचित होत नाही. 'शृंगरपुर' म्हणजे 'शृंगेरी' नव्हे. हे गाव अलाहाबाद जिल्ह्यात गंगातीरावर आहे.[१३] सांप्रत कर्नाटक राज्यात 'तावरे केरि' नावाची अनेक 'पद्मपुर' गावे आहेत हे धडफळे यांचे म्हणणे मान्य केले तरी यातील कोणते 'पद्मपुर' भवभूतीच्या गावाच्या अटी पूर्ण करते हा महत्त्वाचा प्रश्न उरतोच. आणखी एक बारकावा: 'केरि' म्हणजे 'पुर' किंवा 'गाव' नव्हे. 'तावरे केरि' चे शब्दश: संस्कृतीकरण 'पदमसर: पद्मसरोवर' असे होईल. त्यामुळे 'केरि', केरे पदान्त पद्मग्रामे चालणार नाहीत. भवभूतीच्या गजचंदनादि वर्णनांच्या प्रीतीमुळे कर्नाटकाच्या दक्षिणेकडेच

---

१२. पंडित आवळीकर, 'जुने वाङ्मय : नवे संशोधन', (मुक्तेश्वरावर प्रकाश), धारवाड, १९६४ पृ. ९६-९७. या माझ्या लेखातील माझेच पुढील विधान लाल कंदिलासारखे वाटते. ''मुक्तेश्वरास द्राविड देशातील मानून त्याच्या भाषेत द्राविडी लकबा शोधणे हा 'द्राविडी प्राणायाम' ठरेल अशी भीती वाटते'' पृ. ९९.

१३. उत्तर रामचरितम् (सं.) डॉ. राम अवध पाण्डेय, डॉ. रतिनाथ मिश्र, विश्वाविद्यालय प्रकाशन, वाराणसी, पृ. ५७.

आपल्याला मलयसमीर खुणावू लागतो.[१४]

भवभूती हा द्राविड आहे याबद्दल मला संदेह नाही. पंचद्राविडांपैकी तो नेमका कोण आहे हे सांगणे अनेक कारणांनी कठीण आहे. कर्नाटक, आंध्र, तामिळनाडू आणि केरळ या राज्यांच्या आजच्या सीमा आणि भवभूतिकालीन केरळ, पांड्य, चोळ या 'देशां'नी व्यापलेला भाग आणि तेथे असलेली तमिळ ही प्राचीनतर भाषा व तिच्या पाठोपाठ वाढू लागलेल्या तेलुगु-मल्याळम् या भाषा आणि त्यांचे परस्पर -संपर्क व प्रभाव यांचा भवभूतीच्या निमित्ताने अधिक गांभीर्याने विचार झाला पाहिजे. शंकराचार्यांचा (काही काळ) समकालीन म्हणूनही आणि उत्तर दक्षिणेतील दुवा म्हणूनही मला भवभूती वाङ्मयीन, भाषिक सांस्कृतिकदृष्ट्या एक आव्हान वाटतो.

'विदर्भेषु' हा पाठ आता विसरला पाहिजे. 'दक्षिणापथे' म्हणजे दक्षिण टोकाकडील केरळ-तमिळनाडू यांच्यातील, मलय-महेंद्र पर्वतांमधील भागात भवभूतीचे 'पद्मपुर' असावे. श्रीकंठ हे त्याचे आईवडिलांनी ठेवलेले, तर भवभूती हे प्रचारातील नाव असावे. त्याचे कुलनाम निश्चित करण्यात 'उदुंबर' हाच पाठ उपयुक्त ठरणार आहे. याची आजवरची निरुक्ते[१५] वेगवेगळ्या कारणांनी स्वीकारण्यासारखी नाहीत. डॉ. श्री. व्यं. केतकरांपेक्षा काणे यांचे 'उंबेक' विषयक विवेचन चिंतनीय आहे[१६] 'उदुंबर' हे भवभूतीचे कुलनाम असावे आणि ते त्याच नावाच्या गावावरून आले असावे. 'उड्डुंबेन चोळ' किंवा 'उड्डुंबं चोळ' या नावाचे गाव केरळमध्ये आहे. उड्डुंब (न) > उदुंब (र) ही षष्ठयन्त वाटणारी रूपे 'चोळ' (= छाया) > कुळ (= लोक) या शब्दांमागे लागून भवभूतीचे गाव > नाव प्रचलित झाले असावे. त्यांतून पसरणारी 'औदुंबराची छाया' त्याच्या केरळीयत्वावर पुरेसा प्रकाश टाकते. त्याचे नाव म्हणजे एक 'उंब (र) राई' असावी.

---

१४. कल्याण (विवाह), चरित् (इतिहास) हे शब्द संस्कृतपेक्षा भिन्न अर्थाने द्राविडी भाषांत वापरले जातात.

१५. डांबरे, डुंबरे डेंबळ, इ. भवभूतीने सांगितलेले कुळ, गोत्र, शाखा इ. तपशील आणि ही नावे यांचा मेळ बसणे केवळ अशक्य आहे. भवभूतींचा शोध मराठी देशस्थ घराण्यात घेण्यापेक्षा भांडारकरांनी उल्लेखिलेल्या तैलंगी ब्राह्मणांत / त्यांच्या तेलंगणात वा आंध्र, केरळ, राज्याच्या सीमा प्रदेशात घेणेच फलप्रद होय.

१६. परंतु त्यावरून निर्णायक असे काही सांगता येत नाही.





अनुक्रमणिका

'पद्मपुर' या अर्थाची गावे केरळमध्येही असू शकतील. अर्थात 'पद्म' ऐवजी 'तामर' आढळेल[१७] अल्लेप्पी जिल्ह्यात 'तामरकुळम्' हे गाव आहे. लगेच ते भवभूतीचे जन्मस्थान ठरत नाही. परंतु हे दोन्ही संदर्भ फार महत्त्वाचे म्हणून मी देत आहे.

काणे यांनी भवभूतीचे वास्तव्य द्रविड देशात - त्यातही केरळमध्ये काही काळ असावे असे म्हटले आणि त्याला त्यांनी 'मालती माधव'मधल्या ... 'रमण केलिकलहकोपोपरागपल्लवित केरलीकपोल ...' या लवंगिकेच्या उद्‌गारांचा[१८] आधार दिला आणि पूर्वमीमांसा दर्शनाचा अभ्यास त्याकाळी दक्षिण भारतात, केरळमध्ये अधिक होत होता. म्हणून त्या अभ्यासासाठी भवभूती केरळात राहिला असण्याची शक्यताही त्यांनी व्यक्त केली. त्याचबरोबर एक मार्मिक भाष्यही त्यांनी 'केरलीकपोल' स्मृतीवर केले आहे. काणे लिहितात. '"Bhavabhuti who must have been at Padmavati often and long could very well have referred to the rosy cheeks of the women from north or central India, particularly when the place of occurance was Padmavati in Central India and Keral need not have been brought in at all."[19]

काणे यांच्या वरील विधानांना दुरुस्ती-पुस्ती जोडताना मला हे स्पष्ट करावयाचे आहे की, भवभूती हा उत्तरेतून दक्षिणेत -केरळात अभ्यासासाठी आलेला नव्हता. केरळात तो जन्मला, वाढला, शिकला आणि आपल्या कवित्वाचे चीज व्हावे म्हणून उत्तरेत गेला, राहिला, लिहीत राहिला. कालप्रियनाथाच्या जत्रेत आपल्या नाटकांचे दर्शन घडवीत राहिला. 'तर्केषु कर्कशधियः वयमेव नान्यद् / काव्येषु कोमलधियः वयमेव नान्यद्' या कोटीतील हा महाकवी होता. तारुण्याचा वसंत त्याने केरळात भोगला असावा म्हणून माधवाच्या विरहवर्णनात लवंगिकेने, अप्रत्यक्षरीत्या भवभूतीचीच, 'केरलीकपोल' स्मृती जागवली. पुढे त्याच नाटकातील ६ व्या अंकात कामंदकीच्या मुखात 'गाढोत्कंठकठोर केरळवधू गंडाव पांडुच्छदैः...' हा निर्देश

---

१७. तामर (मल्याळम् तेलुगु), तामरै (तामिळ), तावरे (कन्नड)

१८. मालती माधव (सं.) एम्. आर् काळे, १९८३, मोतीलाल बनारसीदास पृ. ७६.

१९. पूर्वोक्त, काणे संपादित उत्तररामचरित, प्रस्तावना, p -२७ (तळटीप)





अनुक्रमणिका

असलेला श्लोक आहे. 'गाढोत्कंठा यस्याः सा च कठोरा तृतीय यौवनवयाः केरलदेशवधूस्तस्या कपोलवदव...' हे टीकाकार जगद्धराचे निरूपण आणि त्यातील 'तृतीया' म्हणजे काय हे सांगणारे भरतांचे अवतरण[२०] पाहिले म्हणजे भवभूतीच्या केरळ- प्रीतीचे विविध पदर उलगडू लागतात. या संदर्भांना 'उत्तररामचरिता' तील काही स्थळांची पुरवणी जोडता येईल असे मला वाटते.

तिसऱ्या अंकात तमसा आणि मुरला या नद्या स्त्रीरूपांत अवतरतात. एकमेकांशी बोलतात. तमसा ही उत्तरेतील, अयोध्येच्या प्रदेशातील, वाल्मीकीशी संबंधित, रामायणात उल्लेखिलेली नदी. त्या उलट मुरला ही दक्षिणेतील, अगस्त्याश्रमाच्या परिसरातील केरळमधील[२१] रामायणात उल्लेख नसलेली नदी. राम-कथेत नसलेली ही नदी कोठून येते? का येते? ती अगस्त्याश्रमातून येते हा अगस्त्याश्रम - पुढे शंबूकानेही निर्देशिलेला अगस्त्याश्रम, गोदातीरावरील जनस्थानाशेजारचा नाही. केरळातला आहे. 'अगस्त्य का आश्रम दक्षिण में मलयपर्वत पर था'' अशी माहिती डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी दिलेली आहे[२२] लोपामुद्रेने मुरला नदीला रामाचे क्षेम विचारायला पाठवले आहे. इतक्या दूरवर. म्हणून तमसा तिला म्हणते ''उचितमेव दाक्षिण्यं स्नेहस्य.'' येथे 'दाक्षिण्या'वर श्लेष आहे. सौजन्याबरोबरच दाक्षिणात्य/ द्राविडत्व हे या शब्दाचे सूचित अर्थ आहेत.

'दाक्षिणाः' हे पर्वतांचे विशेषण शंबूकाच्या मुखात आहे. (अंक २- ३०) 'दाक्षिणात्ये च दक्षिणः' असे त्यावर घनश्यामाचे भाष्य आहे. वीरराघवही 'दाक्षिणाः दक्षिणदिशावर्तिनः' असे म्हणून 'एते ते पूर्वंभवता दृष्टाः' असे अधिकचे सांगतो.[२३] 'भवता' हे पद रामाला उद्देशून असले तरी भवभूतीने 'स्वतः' पाहिले असा ध्वनी

---

२०. रतिसंभोगे दक्षा प्रतिपक्षा सूयिका गुणाढ्या चा
अनिभृत गर्वित चेष्टा सा विज्ञेया तृतीया तु ॥
काणे यांनी न दिलेला हा केरळाचा उल्लेख आहे.

२१. Sanskrit - English Dictionary, V.S. Apte, Motialal Banaraidass, 1963, P. 443

२२. भारतवर्षीय प्राचीन चरित्र कोश, सिद्धेश्वर शास्त्री चित्राव, भारतीय चरित्रकोश मंडळ, पूना, इ. स. १९६४, पृ. ४.

२३. काळे संपादित, उत्तर रामचरित्र, पृ. ६३





अनुक्रमणिका

त्यात आहे. 'मालती माधव'मध्ये (अंक९) ''एषास्मि सौदामिनी भगवत: श्रीपर्वता-दुत्पत्य पद्मावतीमुपाश्रिता'' या सौदामिनीच्या पहिल्याच वाक्यात 'श्रीशैला'चा उल्लेख आलेला आहे. श्रीशैल आंध्रात असला तरी भवभूतीला परिचित असणे स्वाभाविक आहे. पण पुढे 'दक्षिणारण्यभूधरान्' वर जगद्धराची टीका अशी: ''भूधरान्मलयादीन् सौदामिन्या दक्षिणदेशवासित्वेन स्मरणम् ।''[२४] या स्मरणामागे सौदामिनीचेच नव्हे तर भवभूतीचेही 'दक्षिण देशवासित्व' उभे आहे. मलयादीन्' अशा स्पष्ट शब्दात 'केरळ'चा उल्लेख जगद्धराने केला असला तरी... ''मलयादीन् is a slip'' अशी काळे त्यात खोड काढतात.[२५]

'द्राविडोभवभूति:' हे खरेच. तो केरळीय असण्याची शक्यता जास्त. तो दाक्षिणात्य असल्याने आंध्रातून वाहणाऱ्या गोदावरीची त्याने अनेक दर्शने घेतली असतील : अक्षरश: परिक्रमाही केली असेल. त्यामुळे पंचवटी-जनस्थानच्या गोदावर्णनात दाक्षिणात्य गोदा-लहरी उठत राहणे मला तरी स्वाभाविक वाटते.[२६]

उत्तर ती उत्तर आणि दक्षिण ती दक्षिण असे भले कोणी म्हणोत : पण 'उत्तर' रामाचे चरित सांगणारा 'दक्षिण' भवभूती आर्य आणि द्राविड संस्कृतीतील 'दुवा' आहे : आज मुका पण उद्या बोलका ठरणारा. निरवधी काल आणि विपुला पृथ्वी यांच्या द्वंद्वात आपला 'समानधर्मा' शोधणारा.

□□□

**१४ ई. २, सदनिका ६,**

**सिद्धार्थनगर, औंध, पुणे - ४११ ००७**

---

२४. काळे-सपंदित मालती माधव, पृ. १७७

२५. उपर्युक्त, Nrdes, P-75

२६. भवभूतीवरील देश- भाषा संस्कारांचा प्रभाव (काही वेळा अभाव सुद्धा) यांच्या धांडोळ्यावाचून त्याच्या कृतींचे यथार्थ आकलन आणि मूल्यमापन अवघड आहे.

# भाषा आणि उत्क्रांती

**नीलिमा गुंडी**

इयत्ता सहावीच्या इतिहासाच्या पुस्तकातील 'मानवाची उत्क्रांती' हा धडा मी मुलीला नुकताच शिकवला होता. त्यात एप, होमो इरेक्टस, निअँडरथल मानव आणि होमो सेपियन सेपियन असे उत्क्रांतीचे मुख्य टप्पे होते. अभ्यास झाल्यावर उड्या मारणे, खोड्या काढणे अशा लेकीच्या माकडचेष्टा सुरू झाल्यावर मी तिला चिडवायला म्हणून म्हटलं - ''तू 'एप'च आहेस बहुतेक.'' तेव्हा तिनं ताबडतोब उत्तर दिलं - ''नाही. मी 'एप' नाही. मी 'निअँडरथल मानव' आहे. कळप करून राहणारा नि दुसऱ्याविषयी आपुलकी बाळगणारा!'' (ही त्या मानवाची पुस्तकातील वैशिष्ट्ये!)

मी मनात म्हटलं - आहेस ग बाई तू कळप करून राहणारी... सतत मैत्रिणींच्या घोळक्यात असतेसच! तुम्ही १०/१२ मैत्रिणी एकदम डबे खायला बसता तेव्हा कोणीही कोणाच्याही डब्यात हात घालून खाता. त्यामुळे खास पदार्थ केला की प्रत्येकीनं दोन दोन डबे आणायचे असतात आणि आपुलकी वाटण्याविषयी काय सांगावं? आपुलकीचा झरा तुला कुठे वाहवत नेईल याची काळजी करत मला बसावं लागतं.

म्हणजे सध्या हिचा उत्क्रांतीचा दुसरा टप्पा चालू आहे. यापूर्वी रांगण्या-दुडदुडण्याच्या वयात ही 'एप' होतीच आणि अजून ३/४ वर्षांनी थोडी मोठी (शहाणी) झाली की होईलच होमो सेपियन (सेपियन म्हणजे शहाणा!) म्हणजे एका जन्मात उत्क्रांतीचे सगळे टप्पे अनुभवता येतात तर...!

आणखीही मनात आलं.... हे उत्क्रांतीचे टप्पे त्यांच्या शास्त्रीय नावांसकट मला आज कळत आहेत नि हिला दहाव्या वर्षीच कळलेसुद्धा! प्रत्येक पिढी इतक्या वेगाने शहाणी होणार म्हणजे उत्क्रांतीचा पुढचा टप्पाही लवकरच येणार बहुतेक तेव्हा मग त्या शहाण्या (!) मानवाला आजच्या मानवासारखे 'सेपियन सेपियन' असे दोनदा सेपियन म्हणूनही पुरणार नाही. त्याच्या वाढत्या शहाणपणामुळे त्याच्यापुढे

सेपियन हा शब्द चांगला ७/८ वेळा लावावा लागेल आणि त्याच्या नावात सेपियन या शब्दाचीच एक लांबलचक शेपूट तयार होईल नाही?

□□□

**३, अन्नपूर्णा,१२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर**
**५ वी गल्ली, पुणे - ४११ ००२**

---

बऱ्याच लोकप्रिय वस्तूंच्या जाहिराती मुळात, बहुधा इंग्रजीत लिहिल्या जातात व नंतर त्यांचे 'नेटिव' भाषांत रूपांतर केले जाते हे त्यांच्या मराठी रूपावरून तरी उघड होते. हे भाषांतरसुद्धा मुद्दाम ती भाषा न येणारे माणूस शोधून त्याच्याकडून करून घेतात अशी शंका यावी इतके विनोदी असते. नमुन्यादाखल माझ्या नजरेस आलेली काही उदाहरणे देत आहे.

- यामाहावर स्वार व्हा आणि सुखद अनुभव अनुभवा.
- आपल्या जमीन घटकांची सुरक्षा व निश्चिंततेची खात्री
  स्वयंरोजगार व कारकीर्दवृद्धीची निर्मिती
  (पर्ल्स ग्रीन फॉरेस्ट्स लिमिटेड)
- सलोरा टी व्हीची चकित करणारी आश्चर्य
- फझी लॉजिक फुल्ली ऑटोमॅटिक वॉशिंग मशीन
- (जेव्हा तुम्ही इतर गोष्टीत रमला असताना)
- मार्टिन भव्य उच्चाटन योजना
- प्रत्येक मेजवानी अशी असतात जी जीवनभर विसरता विसरत नाही आणि आपण प्रत्येक मेजवानी एक आठवण बनवू शकतो बादशाहच्या मीट, फीश व चीकन मसाल्यांबरोबर ज्यांचे एकापेक्षा एक छान स्वाद.

**जाई निंबकर**





अनुक्रमणिका

# बहुमानार्थी बहुवचन

सुप्रिया सहस्रबुद्धे

प्रत्येक भाषेचे स्वत:चे संकेत भाषांतर करताना गमती निर्माण करतात. संस्कृतातून मराठीसारख्या अनेक भाषांत आलेला संकेत म्हणजे आदरणीय व्यक्तीला बहुवचन वापरणे. हा संकेत मनात इतका ठसलेला आहे की दुसऱ्या भाषेतही अशाच पद्धतीने लेखन केले जाऊ शकते. (इंग्रजीच्या उत्तरपत्रिकेत पत्रलेखन करताना अनेक विद्यार्थी आपल्या वडिलांबद्दलचे They gave me permission for the trip असे लिहितात, म्हणून मी त्यांना रागावले.

पण मराठी व इंग्रजी कवींची तुलना मराठीत करताना माझी अडचण झाली. मी डन, शेक्सपीअर वगैरेंना 'तो' म्हणू शकते, पण केशवसुत, तुकाराम इत्यादींना तो म्हणणे मला अवघड वाटते आणि शेक्सपिअरबद्दल तितकाच आदर असूनही त्याला 'ते' शेक्सपिअर म्हणणे मला विचित्र वाटते. मी काय करावे?

उत्तर सोपे आहे. एक कुठली तरी संबोधनाची रीत दोन्ही भाषांतरांच्या कवींसाठी वापरणे उचित ठरेल. ज्ञानेश्वर, तुकाराम अशा कवींना एकेरी उल्लेखण्यापेक्षा मिल, स्पेन्सर, शेक्सपिअर, कार्लाइल अशांचा बहुमानार्थी बहुवचनी उल्लेख करणे न्याय्य होईल. पण तरीही हा संकेत माझ्या लेखनात आणि वाचकांच्या वाचनात सहजासहजी रुळेल का?

□□□

१०३ विक्रम हाइट्स, ९/११ कोथरुड, पुणे ४११ ०२९

## चर्चा :

अशोक रा. केळकर

मुख्य प्रश्नाला हात घालण्यापूर्वी थोडी तौलनिक पार्श्वभूमी प्रस्तुत करणे उपयुक्त होईल. बहुमानार्थी एकवचनाऐवजी बहुवचनाचा प्रयोग संस्कृतमध्ये सुरुवातीला नव्हता, पाणिनीच्या व्याकरणातही तसा उल्लेख नाही. नंतर हा प्रयोग आला. जोडीला बहुमानार्थी इतर प्रयोग आहेत : भवान् (पुल्लिंगी), भवती (स्त्रीलिंगी) कधी द्वितीय पुरुषी, कधी तृतीय पुरुषी : इत इतो भवान् (इकडे इकडे साहेब). ॐ भवती

भिक्षां देहि (बाईसाहेब हो भिक्षा दे), किमाह भवान् (साहेब काय म्हणतो?). तृतीय पुरुषी रूपांच्या अगोदर जोडून अत्र, तत्र लावतात. परिश्रान्तामत्रभवतीं लक्षये (दमलेली दिसते इकडची बाईसाहेब). (मागच्या पिढीतील मराठीतल्या 'इकडची स्वारी', 'तिकडून म्हणणे झाले' अशा प्रयोगांची आठवण व्हावी.) नंतरच्या काळात भवन्तः (पुल्लिंगी), भवत्यः (स्त्रीलिंगी) असे बहुवचनी प्रयोग आले : श्रुतं भवद्भिः (ऐकलं साहेबांनी? म्हणजे तुम्ही किंवा त्यांनी). यूयम् (तुम्ही) या बहुवचनी सर्वनामाचाही त्वम् ऐवजी प्रयोग होतो. त्याचप्रमाणे वयम् (आम्ही) या बहुवचनी सर्वनामाचा अहम् ऐवजी : वयमपि किंचित्पृच्छामः (आम्ही देखील काही विचारतो). दुसरा एक बहुमानार्थी प्रयोग म्हणजे पादौ या द्विवचनी रूपाऐवजी पादाः हे बहुवचनी रूप वापरणे : एष देवपादान् अधिक्षिपति (हा महाराजांच्या पायांचा अधिक्षेप करतो - म्हणजे तुमचा किंवा त्यांचा अधिक्षेप). कधी पादाः गाळले जातेः इति श्रीशंकरपादाचार्यः किंवा इति श्रीशंकराचार्याः (असे श्रीशंकराचार्य - म्हणतात अध्याहृत).

तृतीयपुरुषी बहुवचनी रूपांचा अर्थाच्या दृष्टीने द्वितीय किंवा तृतीयपुरुषी एकवचनाऐवजी बहुमानार्थी प्रयोग द्रविडी भाषांमधून आढळतो किंवा तिथून तो संस्कृतमध्ये आला असण्याचा संभव आहे. जन्मभाषा द्राविडी असणारी व्यक्ती संस्कृतमध्ये बोलताना-लिहिताना 'श्रीशंकराचार्य म्हणतो' असे म्हणायला कचरत असणार. (my father ऐवजी he म्हणायला भारतीय मुले कचरतात त्याप्रमाणेच.) कालांतराने त्यांचा 'प्रामादिक' प्रयोग सर्वांच्याच बोलण्या-लिहिण्यात प्रतिष्ठा पावला असणार.

'मी' ऐवजी बहुमानार्थी बहुवचनी रूपे किंवा 'तू' ऐवजी बहुमानार्थी द्वितीय किंवा तृतीय पुरुषी बहुवचनी रूपे युरोपीय भाषांमधूनही आढळतात : इंग्रजीत I ऐवजी We किंवा thou ऐवजी you, जर्मनमध्ये du ऐवजी Thr (द्वितीयपुरुषी) किंवा Sie (तृतीयपुरुषी), फ्रेंच मध्ये tu ऐवजी vous. तृतीयपुरुषी एकवचनी रूपांऐवजी बहुमानार्थी बहुवचनी रूपे ही मात्र खास भारतीय लकब दिसते.





अनुक्रमणिका

आता तुकाराम, चाणक्य, शेक्स्पिअर, कार्लाइल इत्यादिकांविषयी आधुनिक मराठी भाषकांना पडलेल्या प्रश्नांकडे वळू. मोरो केशव दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' (१९११) या ग्रंथात याची चर्चा आहे. (छेदक १२४, १२५, २८७, ५७५ पाहावेत. दामले 'बहुमानार्थी' आणि 'आदरार्थी' या दोन्ही पारिभाषिक संज्ञा वापरतात.) दामल्यांच्या चर्चेचा विस्तार करून पुढील व्यवस्था मांडता येईल:

१) एकाच व्यक्तीविषयी बहुवचनाचा उपयोग बहुमानार्थी असतो. पण म्हणून एकवचनाचा उपयोग अनादरसूचक असतो असे नाही. उदाहरणार्थ, आदर आणि आत्यंतिक जवळीक एकत्र आल्यास बहुमानार्थ मागे पडतो : देवा रे, माझी कुळस्वामिनी, माझी आई (पण : माझ्या नवऱ्याच्या आई), माझी ज्ञानेश्वरमाउली.

२) बहुमानार्थी बहुवचनाचा प्रयोग करायचा तर बोलणाऱ्याच्या मनात निर्देशित व्यक्ती बहुमानास पात्र पाहिजे, (सामान्यत:) तिच्याविषयी आदर पाहिजे आणि ती स्थलकालदृष्ट्या आपल्या कक्षेतली वाटली पाहिजे. उदाहरणार्थ, ते दादोबा, पण तो पणिनी किंवा चॉम्स्की (सर्वच व्याकरणकार आदरणीय वाटूनही), भारताचे तत्कालीन राष्ट्रपती, पण अमेरिकेचा तत्कालीन राष्ट्राध्यक्ष (दोघेही बहुमानास पात्र वाटूनही).

३) याहून वेगळा प्रयोग दिसला तर त्याची कारणे पुढीलपैकी असू शकतात. (क) बहुमानास पात्र व्यक्तीबद्दल अनादर दाखवायचा आहे - विशेषत: शिव्याशाप देताना वा हेटाळणी करताना. (ख) बोलणाऱ्याला निर्दिष्ट व्यक्ती स्थळदृष्ट्या परकी वाटते. (ग) बोलणाऱ्याला निर्दिष्ट व्यक्ती कालदृष्ट्या इतिहासजमा वाटते. (घ) आदर असणे, बहुमान दाखवणे त्या त्या संदर्भात गैरलागू ठरतात. उदाहरणार्थ, तटस्थ चर्चेत : भारताचा राष्ट्रपती सामान्यत: आपले अधिकार मंत्रिमंडळाच्या सल्ल्याने वापरतो. तुकारामाचे सामाजिक आवाहन रामदासाच्या सामाजिक आवाहनापेक्षा भिन्न आहे.

४) बहुमानार्थी बहुवचनाचा अनपेक्षित ठिकाणी प्रयोग झाला तर तो बहुधा उपरोधपूर्ण असतो. उदाहणार्थ, आमचे चिरंजीव शाहणे पडले! ('माझा मुलगा

मूर्ख आहे' ऐवजी) गिळा एकदा आणि शाळेला चालते व्हा.

५) काही संबोधने नित्यशः किंवा सामान्यतः बहुमानार्थी बहुवचनी प्रयोगात वापरतात : त्याचा बाप, त्याची आई, पण त्याचे वडील, त्याच्या मातु:श्री; माझा दीर, माझी नणंद, पण माझे भावजी, माझ्या वन्सं, इंग्लंडची राणी, पण इंग्लंडच्या राणीसाहेब; तो बाळ, बाळू, पण ते बाळासाहेब, बाळाजीपंत; तुकारामाला, पण तुकोबांना, तुकाराममहाराजांना.

थोडक्यात सांगायचे तर, जिवंत प्रवाही भाषेतील व्यवस्था नेहमीच सोप्या, ठोक नियमात बसत नाही. परस्परविरोधी सांस्कृतिक प्रवाहांना तिला तोंड द्यावे लागते. उदाहरणार्थ, इंग्लिशभाषकांनी व्यक्तिप्रतिष्ठा जपण्यासाठी thou ऐवजी you कायम केल्याला चारशे वर्षे होत आली. पण परिणामी व्यक्तिनिर्देश अधिक गुंतागुंतीचा झाला. Mr. John Fergusson, Sir John Fergusson, Mr. Fergusson, Sir John (Sir Fergusson नव्हे), John (Mr.John नव्हे), Fergie, Jack, Johnny इतक्या पर्यायांमधून निवड करावी लागते. (पत्नीच्या तोंडी Mr. Fergusson गेल्या शतकात चालत असे, आज मात्र My husband, John असे काही येते.)

दुसरी गोष्ट म्हणजे हे नियम तारतम्याने लावायचे असतात. या तारतम्यभावामागे एक जीवनदृष्टी असते. उदाहरणार्थ, संस्थानी-इनामदारी माहोलात आई मुलाला तुम्ही बाळासाहेब किंवा ते बाळासाहेब संबोधीत असते. उत्तर भारतीय प्रतिष्ठाकांक्षी मध्यमवर्गीय मंडळीत आई मुलाला 'आप जाइये' (फार तर : तुम जाओ), 'इनकी आदत है' इत्यादी प्रकारे संबोधीत असते. मराठीभाषक प्रतिष्ठाकांक्षी मध्यमवर्गीय मंडळीत प्रारंभिक कुटुंबात सर्वच सदस्य एकमेकांशी किंवा एकमेकांबद्दल एकवचनात बोलत असतात.

□□□

**७, धनंजय सोसायटी, ७५९/८३**
**शिवाजीगर, पुणे ४११००४**





अनुक्रमणिका

# - हिंदी साहित्य आणि पत्रकारिता यांच्यातील नाते -

सुप्रिया सहस्त्रबुद्धे

हिंदी साहित्य और हिंदी पत्रकारिता के सरोकार (साहित्य और पत्रकारिता के रिश्तोंपर एक जीवंत संवाद) हे चर्चासत्र दिल्ली येथे ५-६ एप्रिल १९९७ रोजी झाले. या चर्चासत्राच्या बीजभाषणाचा हा मराठी अनुवाद. अनुवादिका आहेत सुप्रिया सहस्त्रबुद्धे

साहित्य आणि पत्रकारिता या एकाच प्रवाहाच्या दोन धारा आहेत. दोन्हींची उद्दिष्टे लोकरंजन व लोकशिक्षण हीच असल्यामुळे दोन्हीच्या परंपरा व संस्कार बरोबरच विकसित झालेले आहेत. भारतीय संदर्भात विसाव्या शतकाचे दोन भाग पडतात. स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर. ब्रिटिश सत्तेच्या जुलमाने ग्रासलेल्या समाजाला झगडण्याची प्रेरणा देण्यामध्ये हिंदी साहित्यिक व पत्रकार दोघांनी केलेल्या प्रयत्नांचा इतिहास उज्ज्वल आहे. निरालांच्या कलकत्यातील 'मतवाला मंडल' मध्ये अनेक साहित्यिक आणि आचार्य शिवपूजन सहाय यांच्यासारखे अनेक पत्रकार कार्यरत होते. स्वातंत्र्यानंतरही हे नाते अभंग राहिले होते. काशीच्या 'जागरण' या साप्ताहिकाला प्रेमचंद व प्रसाद या दोघांचे सहाय्य होते. रामवृक्ष बेनीपुरी, माखनलाल चतुर्वेदी, पद्मकांत मालवीय अशा विद्वानांमध्ये विशुद्ध साहित्यिक कोण व विशुद्ध पत्रकार कोण हे ठरवणे कठीण आहे. हिंदी पत्रकारांना स्वामी दयानंद, बाळ गंगाधर टिळक, महात्मा गांधी, अजीमुल्ला खाँ, माधवराव सप्रे, बाबुराव विष्णु पराडकर, लक्ष्मण नारायण गर्दे, गोविंद रघुनाथ थत्ते अशा अनेक अहिंदी विद्वानांकडून प्रेरणा मिळालेली होती. मदनमोहन मालवीय, अमृतलाल चक्रवर्ती, बाबुराव विष्णू पराडकर, आचार्य शिवपूजन सहाय अशा अनेक पत्रकारांना हिंदी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला आहे. हा सर्व आपल्या स्वातंत्र्यपूर्व इतिहासाच्या सामूहिक वारसा आहे.

विसाव्या शतकाच्या साहित्य व पत्रकारितेबरोबर हिंदी साहित्य व पत्रकारितेनेही समाजातील अन्याय, अव्यवस्था आणि अतिक्रमणाविरुद्ध लोकांना प्रेरणा दिली आहे. महायुद्ध, गृहयुद्ध आणि शीतयुद्ध यांच्यामध्ये लोकशाही अणि मानवी हक्क यांच्या प्रतिष्ठेसाठी हाक दिली गेलेली आहे. कारण संवेदनशीलता आणि सत्य लिहिण्याचे धाडस हाच दोघांचा धर्म आहे. पण स्वातंत्र्यानंतर हिंदी जगतात या

दोघांनी एकत्र येऊन काही संघर्ष केलेला नाही. बौद्धिक कर्माची पाखंडे केली, तात्त्विक वादविवादांची धूळ उडवली, मूल्ये, नीती व सांस्कृतिक हल्ल्यांबद्दल लेखणी झिजवली पण जास्त करून शाब्दिक कसरती करण्यामध्ये आपली विश्वासार्हता आणि आपला चेहरा मात्र ते हरवून बसले. कधी सत्ता, कधी विरोधी पक्ष, कधी प्रकाशक - यांच्या हातातली बाहुली बनले. स्वातंत्र्यानंतर साहित्य आणि पत्रकारिता यांच्याशी निगडीत अनेक बुद्धिजीवींच्यावर पाश्चात्त्य विचार आणि आदर्शांचा प्रभाव पडला आहे. कदाचित त्यामुळे ही दोघांमधली दरी निर्माण झाली आहे. सामान्य माणसाच्या झगड्यामध्ये साहित्य आणि पत्रकारिता उभे राहतात पण वेगळे वेगळे. कदाचित अहंकार, कुंठितपणा आणि संवादहीनतेमुळे हे वेगळेपण येत असेल. स्वातंत्र्यानंतरच्या पन्नास वर्षात कितीतरी हिंदी वृत्तपत्रे व नियतकालिके निघाली आणि बंद पडली. 'धर्मयुग', 'सारिका', 'दिनमान', 'पराग', 'नवभारत टाइम्स' च्या कितीतरी आवृत्त्या आणि पन्नास एक प्रकाशनांचा अपमृत्यू पाहून किती श्रेष्ठ व्यक्तींनी आपला निषेध खेद व्यक्त केला आहे? त्यासाठी शोकसभासुद्धा झाली नाही. गेल्या वीस वर्षात हिंदी पत्रकारितेच्या संकटांबद्दल हिंदी साहित्यात काही खळबळही माजली नाही. एकत्र उभे राहणे जाऊ दे, कादंबऱ्या, कथा किंवा साहित्यिक परिसंवादातसुद्धा चिंता व्यक्त केली गेली नाही. सिनेमा, टी.व्ही मालिका आणि फुटकळ मनोरंजनाच्या बडिवारात संगीत, नृत्य, चित्रकला वगैरेंचीही उपेक्षाच चालली आहे. रविवारच्या आवृत्त्यांत सुद्धा त्यांना अंग चोरूनच स्थान मिळते. हे सर्व दुःखदायक आहे. मराठी, बंगाली, गुजराथी, तामिळ किंवा मल्याळीमध्ये - साहित्य व पत्रकारिता यांच्यात परस्पर आदर व सहकार्य असते; तर हिंदीत ते का नाही?

स्वातंत्र्यानंतर साहित्य आणि पत्रकारिता या दोन्हीशी निगडित असलेल्यांच्या कार्यकर्तृत्वाबद्दल शंका घेतली जात आहे. अज्ञेय, रघुवीर सहाय, धर्मवीर भारती, कमलेश्वर, मोहन राकेश, श्रीकांत वर्मा, विष्णु खरे किंवा राजेंद्र यादव अशा लोकांची एक मोठी फळी स्वातंत्र्योत्तर पिढीचे पुढारीपण करीत आहे. त्यांचे कर्तृत्व साहित्यात अधिक आहे की पत्रकारितेत, हे ठरवणे आपले काम नाही पण दोन्हीची बांधिलकी एकच आहे हे स्पष्ट आहे. याच प्रकारे श्रीकृष्ण दत्त पालीवाल, कमलापती त्रिपाठी, विद्याभास्कर, श्रीकांत ठाकूर, राहुल बारपुते, लक्ष्मीकांत वर्मा अशा लेखकांचे लेखन म्हणजे साऱ्या हिंदीच्या विश्वाची ठेव आहे. दोन्हींमधले आंतरिक नाते पहाण्यासाठी संघर्षाऐवजी सहकार्याची दृष्टी पाहिजे. पत्रकारिता म्हणजे साहित्याचे अवमूल्यन नाही. लोकसंपर्काचे सर्वात प्रामाणिक आणि विश्वसनीय असे ते स्वतंत्र रूपाचे

माध्यम आहे. त्याला सर्व जगात शीघ्र साहित्य अशी मान्यता आहे. त्यातून मौलिक साहित्याला सामर्थ्य मिळते. साहित्याच्या उपेक्षेमुळे पत्रकारिता राजकारणाकडे झुकते आहे. त्यामधील सामाजिक बांधिलकी, ग्रहणशीलता व विनम्रता कमी झाली आहे. वाचकांचा सक्रिय सहभाग हळूहळू कमी होत आहे. संपादकांना येणाऱ्या पत्रांची संख्या घटते आहे. अभिव्यक्तीची तीव्रता कमी आणि सत्तेवरील टीका बोथट होत आहे. विश्लेषणाची खोली आणि संवेदनशीलतासुद्धा लयाला चालली आहे. संपादकाच्या पदाचे अवमूल्यन, इंग्रजीच्या अनुवादामुळे बोजड व कुरूप होत चाललेली भाषा, विशिष्ट मानदंड न मानल्यामुळे आलेले अराजक आणि सत्य बोलण्या-लिहिण्याचे साहस नसणे अशा पत्रकारितेवरच्या आपदांच्या प्रसंगी साहित्याने हस्तक्षेप करावा हे अपरिहार्य आहे. स्वातंत्र्यानंतर राजकारणाला सर्व उपक्रमांच्या मध्यभागी स्थान मिळाले आहे. त्यांचा संचार सर्वत्र आहे आणि त्याची सावली जीवनाच्या सर्व शुभग्रहांवर पडली आहे. त्यामुळे साहित्य आणि पत्रकारिता या दोन्हीमध्ये जे काही सत्य, शिव व सुंदर आहे. त्याला ग्रहणाचे वेध लागले आहेत.

फायदेशीर विक्री हे एकमेव ध्येय आणि त्यासाठी दर्जाबद्दल कोणतीही तडजोड या परिस्थितीत अभिरुचीबद्दल जागरूक प्रकाशकांसमोर आव्हानेच उभी आहेत. आर्थिक उदारीकरणात एखाद्या बहुराष्ट्रीय कंपनीच्या हल्ल्याने काय उलटापालट होते हे आपण पाहिलेच आहे. आता इंग्रजीचे आक्रमण इंग्रजी सत्तेपेक्षा कडवे आहे. गेल्या सहा वर्षात इंग्रजीने नवी आर्थिक व सांस्कृतिक गुलामी आणली आहे. हिंदीच्या आकाशात स्वजनांच्या, तरुणांच्या उपेक्षेचे काळे ढग दाटले आहेत. घटनेत राष्ट्रभाषा असलेल्या या भाषेला आपण शिक्षणाची व सरकारची भाषा हा मानही दिलेला नाही. साहित्य आणि पत्रकारितेचे वाचक भविष्यात कुठे शोधायचे? मॉरिशसला, फिजी बेटांत की सुरीनाममध्ये? हे सर्व आपल्या संयुक्त बांधिलकीच्या कक्षेत येत नाही का? नसेल, तर का नाही? आणि असेल तर त्यावर उपाय काय? हा या चर्चेचा महत्त्वाचा मुद्दा आहे. आपण यात स्वतःची भर घाला अथवा घालू नका, आपण सहमतही नसू शकाल, पण या संवादात भाग घेणं ही पहिली व शेवटची अट आहे, नाही का?

□□□

**१०३ विक्रम हाइट,**
**कोथरुड, पुणे ४११०२९.**



अनुक्रमणिका

# आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक न्यूनगंड : काही प्रतिक्रिया

**कैलास सार्वेकर**

'भाषा आणि जीवन' च्या वर्ष १६ : अंक १ साठी ६ आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक न्यूनगंड : वास्तव आणि उपाय' हा लेख स्वीकारला गेला. त्याच वेळी, ''विद्यार्थ्यांसाठी केलेल्या प्रयत्नांच्या संदर्भात विद्यार्थ्यांकडून एखादा लेख मिळू शकेल का? 'लेख' म्हणण्यापेक्षा त्यांच्या प्रतिक्रिया, त्यांना जाणवलेलं त्यांच्यातलं भाषिक परिवर्तन.'' अशी सूचना संपादकांकडून आली होती. या सूचनेमुळे अर्थातच हुरूप आला.

विद्यार्थ्यांना वर्गामध्ये तसे आवाहन केले. या आवाहनाला विद्यार्थ्यांकडून चांगल्यापैकी प्रतिसाद मिळाला. विद्यार्थ्यांकडून आलेल्या लिखित प्रतिक्रियांपैकी काही निवडक प्रतिक्रियांमधील महत्त्वाचा भाग याप्रमाणे -

प्रथम वर्ष कला वर्गातील विद्यार्थी रमेश वसावे लिहितो, ''महाविद्यालयात प्रवेश अर्ज भरत असताना विद्यार्थी सांगायचे की, विषय निवडताना मराठी विषय घेऊ नको. मी त्यांना कारण विचारले तर ते म्हणाले की, सार्वेकरसर वर्गात काहीही विचारतात. तसेच मुळाक्षरे विचारतात.'' परंतु मी त्यांच्याकडे लक्ष दिले नाही आणि स्वतःच्या आवडीने मराठी विषय घेतला...

...शुद्धलेखनाविषयक नियम सर शिकवू लागले. तत्पूर्वी मला एकही नियम माहीत नव्हता. शुद्धलेखनाच्या नियमांवरून मला बरेच काही शिकायला मिळाले. म्हणजे ऱ्हस्व-दीर्घ, वेलांटी-उकार कोठे द्यावा इत्यादी हे नियम शिकवून झाल्यावर सरांनी शुद्धलेखनाची लेखी स्पर्धा घेतली. प्रत्येकाकडून एक रुपया गोळा करून जमलेली रक्कम प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यास दिली. विशेष म्हणजे परीक्षकही आम्हीच होतो. या स्पर्धेमुळे आमचा उत्साह वाढला. निबंधलेखन करून आणणे व त्यानंतर त्या विषयावर वर्गात तोंडी बोलणे या प्रयोगाने विद्यार्थ्यांची बोलण्याची क्षमता वाढली. हे प्रयोग करण्यापूर्वी माझी वेगळीच अवस्था होती. म्हणजे सरांनी प्रश्न विचारला की खाली मान घालायची. कारण आपण उत्तर देताना चुकलो तर सर बोलतील आणि इतर विद्यार्थी आपल्याला हसतील अशी भीती होती. जर सरांनी उठवलंच तर कापत कापत उभं राहायचं आणि कसंतरी उत्तर द्यायचं. त्याचप्रमाणे सर जे वर्गात मध्येच प्रश्न विचारतात ते योग्यच आहे. कारण शिकवण्याकडे लक्ष नसणाऱ्यालाच





अनुक्रमणिका

सर प्रश्न विचारतात व त्यामुळे त्याचे लक्ष शिकवण्याकडे वेधले जाते.''

विजय पाडवी हा द्वितीय वर्ष कला मधील विद्यार्थी. तो म्हणतो, ''वारंवार प्रश्न विचारणे आणि परीक्षा/स्पर्धा घेणे यामुळे आम्ही अधिक अभ्यास करू लागतो. तसेच प्रश्नांची उत्तरे देता देता आमची बोलण्याची जिद्द वाढत जाते. विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर जर एखाद्या विद्यार्थ्याने दिले तर आपल्याला असे वाटते की, तोच कसा स्पष्ट उत्तरे देऊ शकतो. आपण प्रश्नाचे उत्तर का देऊ शकत नाही? असे वाटल्याने आपण अधिक अभ्यास करू लागलो.

जेसा पाडवी हा द्वि. व. कला मधील विद्यार्थी लिहितो, ''... अशा प्रकारचे प्रयोग म्हणजे विद्यार्थ्यांची एक प्रकारची कसोटीच. पहिला प्रयोग 'शुद्धलेखनविषयक नियमांचे पाठांतर.' दुसरा प्रयोग 'पत्रे, निबंध इ. लिहून घेणे व तोंडी सांगणे हे आहे. हे प्रयोग झाल्यावर आम्हाला समजलं की त्यामधून आमची अभ्यासाची तयारी कशी झालेली आहे, कोणत्या पद्धतीने झालेली आहे आणि अभ्यास किती झालेला आहे याची पूर्ण तयारी करून घेतली जात होती. यापूर्वी आम्ही असा अभ्यास केलेला नव्हता. आम्हीच आमची चाचणी घेतलेली नव्हती. आमच्या मनात एक प्रकारचा न्यूनगंड निर्माण झाला होता. द्विधा मन:स्थिती निर्माण झाली होती; प्रश्न विचारला की, थरथर कापणे, अडखळत उत्तरे देणे अशी अवस्था होती. प्रयोग केल्यानंतर किंवा प्रयोग करायचे राहिले की, बाकीचे विद्यार्थी अभ्यास करून येत असत आणि प्रश्न विचारला की पटापट उत्तर देत (उषा पावरा, सुचिता वसावे, अजय दिवटे, शरद पाटील, ओंकार वाडिले, राकेश माळी इ.) हे सर्व विद्यार्थी कोणताही संकोच न बाळगता आपल्याला पडलेले प्रश्न सरांना विचारत. सरांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरं देत. या विद्यार्थ्यांच्या उत्तरांचं आम्ही नीट श्रवण करू लागलो. विचार करू लागलो, हे विद्यार्थी इतक्या चांगल्या प्रकारे उत्तरे देऊ शकतात तर आपण का देऊ शकत नाही? आम्ही देखील अभ्यास करू लागलो आणि आमच्याकडून नीट प्रश्नोत्तरे दिली जाऊ लागली. पुढे देखील असे प्रयोग होत राहिले. यावरून आम्हालाच आमची जाणीव झाली की, हे प्रयोग करण्यापूर्वी असे प्रश्न आमच्याकडून प्रत्यक्ष सुटत नव्हते तर कोणाकडून तरी सोडवून घ्यावे लागत होते. म्हणजे आमचाच 'न्यूनगंड' हा मित्र आम्हाला जखडलेला होता. या न्यूनगंडाला टाकला अन् त्यामुळे परीक्षेत सहज सोप्या पद्धतीने उत्तरे लिहू लागलो. वर्गात बोलू लागलो. हे प्रयोग सफल झाले. त्यांनी विद्यार्थ्यांची स्थिती बदलली. सुरुवातीस जे विद्यार्थी न्यूनगंडामुळे वर्गाबाहेर पडत होते ते देखील वेळेवर हजर राहू लागले.

जास्त संख्येने स्पष्टपणे उत्तरे देऊ लागले. - या पद्धतीने अभ्यास केला तर विद्यार्थी परीक्षेत कधीही नापास होऊ शकत नाही. कारण हे प्रयोग करायचे म्हटले की अभ्यास करावाच लागतो. विद्यार्थ्यांचा अभ्यास आणि परीक्षेची तयारी दोन्हीही आपोआप होऊन जातात.

मनोहर गावीत (प्र. व. कला) प्रतिक्रियेत म्हणतो - ''... आता लिहिता लिहिता शुद्धलेखनाचे नियम मनात येतात व योग्य ठिकाणची चूक लक्षात येते. प्रामुख्याने शुद्धलेखनाची जी स्पर्धा घेतली ती विशेष महत्त्वाची वाटली. यामुळे विद्यार्थी जास्तीत जास्त अभ्यास करून नंबर मिळविण्याचा प्रयत्न करतील व त्यांचा अभ्यासही आपोआप होईल.

- निबंधाच्या विषयावर वर्गात चर्चा करून मुद्दे लिहून देणे - त्या आधारे विद्यार्थ्यांनी घरून निबंध लिहून आणणे - यामुळे स्वत: निबंध लिहिण्याची सवय झाली. चर्चा झालेल्या मुद्यांना धरून निबंध लिहिण्याचा आनंद वेगळाच वाटला. कारण यापूर्वी पुस्तकातून पाहून निबंध लेखन करीत होतो. कल्पनाविस्तार, सारांश लेखन, पत्र लेखन याबाबतही असाच अनुभव आला. सारांशलेखनाचा सराव वर्गात व घरी होत राहिला त्यामुळे जरी मला आता एखादा उतारा दिला तरी त्याचे मुद्दे काढून कमीत कमी शब्दांत व स्वतःच्या भाषेत लिहू शकतो. पत्र लेखनाच्या बाबत मात्र अधिक सराव करून घ्यायला हवा होता असे वाटते. जाहिरात लेखनात योग्य नमुने दाखवून जाहिरातीचे घटक सोदाहरण समजावल्याने वृत्तपत्र, आकाशवाणी, दूरदर्शनसाठी जाहिराती लेखन करून घेतल्याने त्यांचा सराव झाला. मात्र, दूरदर्शन जाहिरातीचा सराव अधिक व्हायला हवा होता. ''फळ्यावर सरांनी प्रत्यक्ष जाहिरात तयार करून दाखविली असती तर बरे झाले असते.'' अशी महत्त्वाची सूचना या विद्यार्थ्याने केली.

वर्गात धाडसीपणाने बोलणारी, उत्तरे देणारी द्वि. व. कला वर्गाची विद्यार्थिनी कु. उषा पावरा लिहिते, ''प्र. व. कला वर्गात आल्यावर कुणाशीही बोलण्याचे धाडस होईना. कुणाशी तसा जास्त परिचयही नव्हता. शिक्षकांनी विद्यार्थ्यांचा परिचय करून घेतला. आपला सर्वांना करून दिला. त्यानंतर शिकवायला प्रारंभ केला.

....प्रथमच शिक्षकांनी अभ्यासासंबंधी प्रश्न विचारले. सर्व वर्गात शांतता होती. मला त्या प्रश्नांची उत्तरे येत होती. पण बोलण्याचे धाडस होत नव्हते. मनात वाटतं होतं की, आपण इतक्या सर्व विद्यार्थ्यांसमोर बोलल्यावर काही चुकलं तर आपल्याला मुलं हसतील (सहसा मुलेच हसतात). परंतु शिक्षकांनी त्यांना बोलू





अनुक्रमणिका

नये अशी सूचना दिली तेव्हा धीर येऊन- धाडस करून त्या प्रश्नांची उत्तरं दिली. तेव्हापासून वर्गात, चारचौघांत बोलण्याच्या भीतीची आता तशी जाणीव होत नाही.

...वर्गात प्रश्नांची चर्चा होते. विद्यार्थ्यांचा सहभाग वाढतो आणि इतर विद्यार्थ्यांचे विचार कळतात. त्यांतही शिक्षकांचे मार्गदर्शन घेऊन आम्ही आमचे विचार मांडून प्रश्नांची उत्तरे तयार करण्याचा प्रयत्न करत असतो. यापूर्वी उतारा-गाईडवरून उत्तरे तयार करीत होतो. पण आता स्वयंअध्ययनाचे महत्त्व समजले आहे.''

एकाच वेळी न थांबता वर्गात चाळीस म्हणी आणि चौसष्ट वाक्प्रचार तोंडपाठ सांगणारा दनियाल (प्र. व. कला) हा विद्यार्थी लिहितो, ''प्राथमिक शाळेत हुशार विद्यार्थी गणला जात होतो. पण अभ्यासाकडे दुर्लक्ष करायचो. माध्यमिक शाळेत शिक्षकांचा मार खावा लागायचा म्हणून कसाबसा अभ्यास करायचो. ज्युनिअरला कोणी शिक्षा केली नाही की गृहपाठ दिले नाहीत. म्हणून अभ्यासाकडे पार दुर्लक्ष झाले. परंतु महाविद्यालयात आल्यावर आपण एका दिवशी प्रथमच मला अचानक उभं करून प्रश्न विचारला. मला त्याचं उत्तर आलं नाही. पण तेव्हापासून अभ्यासाकडे लक्ष देऊ लागलो. तसेच गृहपाठ, पाठांतर घेणे यामुळेही अभ्यासाकडे लक्ष द्यायला लागलो. विद्यार्थ्यांनी अभ्यासाकडे लक्ष द्यावे यासाठी आपण जे विविध पद्धतींनी प्रयत्न करता ते मला फार उपयुक्त वाटतात,

सोवज्या गावीत (द्वि. व. कला) या विद्यार्थ्यनेही इतरांप्रमाणे विचार मांडले. शिवाय ललित साहित्याचे वाचन, परिसंवादात सहभाग या गोष्टींमुळे कलागुण विकसित होतात. शैक्षणिक व बौद्धिक विकासाला चालना मिळते अशा आशयाचे विचार व्यक्त केले.

नवापूर महाविद्यालयात साधारणत: २० ते ३० टक्के बिगर आदिवासी विद्यार्थी आहेत. त्यांतील ओंकार वाडिले व राकेश माळी या दोन विद्यार्थ्यांनीही आपल्या प्रतिक्रिया लिहून पाठविल्या ''प्र. व. वर्गात शुद्धलेखन न आल्याने उभे केले - सरांचा प्रथम थोडा रागच आला - पण नंतर अभ्यासाचे महत्त्व कळू लागले. अवांतर माहितीचाही उपयोग झाला.'' असे वाडिले लिहितो तर राकेश माळी याने वर्गात विद्यार्थ्यांनीच सादर केलेल्या पथनाट्यामुळे 'पथनाट्य लेखन' या उपयोजित मराठीच्या पेपरमधील अभ्यासक्रमाची नीट ओळख झाली, असे म्हटले आहे. तसेच विद्यार्थ्यांच्या भावभावना ओळखून त्यांच्याशी समरस होऊन शिकविण्याच्या पद्धतीचाही उपयोग होतो, असे तो लिहितो.

आदिवासी बोलीत साहित्यलेखन करणारा नवापूर महाविद्यालयाचा माजी

विद्यार्थी देवेंद्र वसावे. सध्या कोळदे (ता. नवापूर) ग्रा. पं. सरपंच. त्याच्याही या संदर्भात प्रतिक्रिया मागितल्या. त्याने अनेक मुद्द्यांचा समावेश आपल्या विस्तृत प्रतिक्रियेत केला आहे. त्यांतील काही महत्त्वाचा भाग त्याच्याच शब्दांत पुढीलप्रमाणे-

''तिसऱ्या प्रयत्नात बारावी पास होऊन ऑगस्ट १९८८ ला नवापूर महाविद्यालयात प्रवेश घेतला. तिसऱ्या प्रयत्नात बारावी झाल्याने बरेचसे विद्यार्थी पुढे निघून गेले होते. बारावीत असताना जे विद्यार्थी दहावीला होते त्यांच्याबरोबर आता प्रथम वर्षाला बसत होतो. त्यामुळे वर्गात बसताना थोडासा कमीपणा वाटायचा.

''भाषिक समस्या ही माझी शिक्षणाची दुसरी समस्या होती. वर्गात बसण्याव्यतिरिक्त आम्हा विद्यार्थ्यांचे संभाषण हे आमच्या भिलोरी बोलीतूनच चालायचं. तशी आधीपासूनच माझी मराठी भाषा बेताचीच होती. त्यामुळे माझे उच्चारही व्यवस्थित नसायचे. 'श' च्या जागी 'स', 'ण'च्या 'न', 'ष' च्या जागी 'स', 'ळ' च्या जागी 'ल' असे उच्चार व्हायचे. एखादं वाक्य जर 'तो भाषण करतो.', 'तो शाळेत जातो' असे असेल तर 'तो भासण करतो', 'तो सालेत जातो' असा उच्चार व्हायचा. त्यामुळे सरांनी आपल्याला एखादा प्रश्न विचारला आणि आपल्याला त्याचं उत्तर देता आलं नाही किंवा आलंच आणि वर सांगितल्याप्रमाणे आपला उच्चार झाला तर वर्गात आपली फजिती होऊ नये म्हणून मी शक्यतो मागच्या बाकावर बसायचो. तोही उंच मुलाच्या पाठीमागच्या बाकावर. हेतू हा की, जर सरांनी एखादा प्रश्न विचारला तर उंच मुलाच्या मागे आपण सरांना दिसणार नाही. त्यामुळे जणू काही तो प्रश्न आपल्याला विचारलाच नाही असा आविर्भाव चेहऱ्यावर आणायचा. अशा तयारीनेच वर्गात बसायचो. अशा मानसिक अवस्थेतच मी महाविद्यालयात जात होतो. माझ्यातली ही मानसिकता दूर करून मला योग्य वेळी प्रोत्साहन देऊन, मार्गदर्शन करून प्रा. कैलास सार्वेकर यांनी माझ्या शैक्षणिक-व्यक्तिगत व सामाजिक जीवनात परिवर्तन घडवून आणले. सरांशी माझा परिचय असा झाला :

सुरूवातीलाच सरांनी आम्हाला शुद्धलेखन शिकविण्यास सुरुवात केली. अधूनमधून ते मुळाक्षरे-स्वर-व्यंजन यावर प्रश्न विचारायचे. या प्रश्नांची उत्तरं द्यायची माझ्यावर पाळी आली नाही. विद्यार्थ्यांचं चुकलं तरी सर रागवायचे नाहीत. उलट समजावून सांगायचे तरीही माझ्या मनात चुकल्या चुकल्यासारखं वाटायचं. ''सालं आपण आता उच्च शिक्षण घ्यायला आलो आहोत. तर आता व्याकरण-शुद्धलेखन यांची काय गरज?'' असं वाटायचं. अभ्यासक्रमाव्यतिरिक्त सर काहीपण विचारत

राहतात. एखाद्यावेळी आपलं उत्तरं चुकलं तर वर्गात चांगल्या चांगल्या मुली असतात. त्यांच्यासमोर नाहक आपला अपमान होणार आणि त्यातल्या त्यात वडील प्राथमिक शिक्षक आहेत, असं सरांना आणि विद्यार्थ्यांना कळलं तर, शिक्षकाच्या मुलाला साध्या प्रश्नांची उत्तरं देता येत नाहीत असं म्हणतील. अशा अनेक शंका-कुशंका मनात उपस्थित व्हायच्या त्यामुळे मी सुरुवातीला मराठीचा तास बुडवू लागलो. मधल्या सुटीत मुलांना 'आज काय शिकवलं' विचारलं ते विचारायचो. तर, ''बोठाहां तिज दोस्या हाय तं!'' (सर्वांची तीच दशा आहे तर!) असं सांगायचे. मग हायसं वाटायचं. आपल्यासारखे अनेक विद्यार्थी आहेत. पण असं आपण किती दिवस तास बुडवणार? असं स्वत:ला बजावून वर्गात बसू लागलो. एव्हाना माझी तासाला न बसण्याची स्थिती सरांनी ओळखली असावी. 'वर्गात नव्हतास?' असं सरांनी विचारलं तर एस.टी. बसची सबब पुढे करून 'सर, बस लेट आली म्हणून तास बुडला' असं म्हणून वेळ मारून न्यावा लागायचा. सर आम्हा विद्यार्थ्यांशी आपलेपणाने वागतात असे समजल्यावर हळूहळू वर्गात रमू लागलो. सर आम्हा विद्यार्थ्यांकडून शुद्धलेखन, वाचन, संभाषण करून घेऊ लागले. त्यामुळे मीही विद्यार्थ्यांत, वर्गात मिसळू लागलो. प्राध्यापक या शब्दाबद्दल वाटणारी भीती हळूहळू कमी होऊ लागली. आपल्यातलाच कोणीतरी विद्यार्थी आपल्याला शिकवत आहे असं वाटायचं. सरांना नि:संकोचपणानं शंका विचारू लागलो. सरसुद्धा केव्हाही शंकेचे निराकरण करायचे. पुढे नावानिशी आणि गावानिशी ओळखू लागले. त्यामुळे माझी सरांशी जवळीक साधली ती कायमची.

द्वितीय वर्षाला असताना सरांनी महाविद्यालयात भित्तिपत्रिका काढायचे ठरविले. लेख , कथा, कविता, लोकसाहित्य हे भित्तिपत्रिकेत प्रकाशित करून एका शोकेस मध्ये लावू, असे आम्हाला सांगण्यात आले. तेव्हा सुरुवातीला भित्तीपत्रिका ही नेमकी काय भानगड आहे ते मला कळलं नाही. 'आदिरंग' हे नाव भित्तीपत्रिकेस सरांनी दिलं होतं. 'आदिरंग' हा शब्दपण नवीनच वाटायचा. जो सरांनीच आम्हाला व्यवस्थित समजावून सांगितला. आपण ज्या परिसरांत राहतो त्या परिसराला लाभलेली प्राचीनतम आदिम संस्कृती आणि नवापूर परिसराला सुजलाम् सुफलाम् करणारी नवापूरलगत वाहणारी 'रंगावली' नदी म्हणून 'आदिम' व 'रंगावली' या दोन शब्दांच्या द्विआद्याक्षरांतून हे नाव सिद्ध केलं आहे. तेव्हा आपल्याच भावविश्वाशी निगडित असलेल्या शब्दांत किती सामर्थ्य आहे. हे कळलं, तरीही आपल्यासारख्याने कथा,

कविता, लेख लिहिणे म्हणजे स्वत:च स्वत:चे हसे करून घेण्याचा तो एक प्रकार आहे असे वाटायचे. तरीही काहीतरी लिहायला काय हरकत आहे. सरांनी सांगितलं आहे, चुकलं तरी चालेल पण प्रयत्न करा. प्रथम मी व्यसनाधीनतेवर एक लेख लिहिला. सरांनी प्रशंसा केली. 'आदिरंग' च्या दुसऱ्या अंकात तो प्रसिद्ध झाला. अंगावर मूठभर मांस आल्यासारखं वाटलं. छोटंसं का असेना परंतु पहिलं वहिलं साहित्य 'आदिरंग' मध्ये झळकलं. त्याच वर्षी महाविद्यालयाचे 'एकलव्य' नावाचे वार्षिक नियतकालिक प्रसिद्ध झाले. 'एकलव्य' मध्येही माझा लेख प्रसिद्ध झाला. वार्षिक पारितोषिक वितरण समारंभात या लेखाला 'सर्वोत्कृष्ट लेखनाचा' पुरस्कारही मिळाला त्यामुळे लेखनाचा उत्साह वाढू लागला. विशेषत: मी आमच्या भिलोरी बोलीतून लिखाण करावं असं सर सांगू लागले. सरांच्या घरच्या व महाविद्यालयाच्या ग्रंथालयातून मान्यवर लेखकांची पुस्तकं वाचायला घेऊन जाऊ लागलो. मी हळूहळू भिलोरी बोलीत कविता लिहायचा प्रयत्न करू लागलो. हे सगळं न कळत होत होतं. एकदा का कविता तयार झाली की, कधी एकदा सरांना दाखवीन असं होऊन जाई. सर कविता वाचून कौतुक करायचे. गद्य-पद्य लेखनात आशयाचे महत्त्व तसेच अभिव्यक्तीसाठी शुद्धलेखनाचा, भाषाशास्त्राचा कसा उपयोग होतो, याविषयी मार्गदर्शन करायचे. त्यामुळे हळूहळू गद्य-पद्य सुधारू लागले. सध्या आदिवासी बोलीतील शब्दांचा कोश तयार करीत आहे. आतापर्यंत सुमारे एक हजार शब्दांचा समावेश त्यात झाला आहे.

मराठीचा प्राध्यापक म्हणून मी पारंपरिक पद्धतीपेक्षा थोड्या वेगळ्या पद्धतीने जे प्रयत्न केले त्याचे हे फलित. विद्यार्थ्यांनी नि:संकोचपणे दिलेल्या अभिप्रायांचे हे संकलन.

□ □ □

५६ ब, मंगलदास पार्क, नवापूर (४२५ ४१८)
जि. धुळे दू. भा. (०२५६९) ५०९१४

---

**'सहसा' ह्या क्रियाविशेषणाचा उपयोग**

**दैनिक 'सकाळ' च्या बुधवार दि. २५.२.९८ च्या अंकात 'प्रवाह' ह्या सदरात (पृ. ४) पुढील वाक्य वाचनात आले. ''(फॉरवर्ड शॉर्ट लेग ही क्षेत्ररक्षणाची जागा) चेंडूच्या फटक्यांचा नेम सर्वांत जोरात लागेल अशी असल्याने तेथे उभा राहणारा क्षेत्ररक्षक सहसा शिरस्त्राण वापरतो.'' 'सहसा' चा होकारार्थी वाक्यात उपयोग अपरिचित आहे. त्याचा उपयोग नकारार्थ दर्शविण्यासाठी होतो. त्यामुळे वरील वाक्य अशा सारखे हवे होते.'' ...क्षेत्ररक्षक सहसा शिरस्त्राण घातल्याशिवाय मैदानावर येत नाही.'' महाराष्ट्र कोश मंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या महाराष्ट्र शब्दकोशात 'सहसा'च्या उपयोगाची जी उदाहरणे दिली आहेत ती सारी नकारार्थी आहेत.**

**म. अ. मेहेंदळे**

# पंचेंद्रियांसी श्रुतीही रिघाल्या

**सत्त्वशीला सामंत**

सहज कधीतरी हिंदी-मराठी शब्दकोश चाळत असता, अचानक एक साक्षात्कार झाला. निरनिराळ्या आवाजांचे अनुकरण करणाऱ्या हिंदी शब्दांच्या अखेरीस 'आहट' (आवाज) हे पद जोडलेले असते. (उदाहरणार्थ, 'झनझनाहट, खडखडाहट, कडकडाहट, कुलबुलाहट, छनछनाहट', इत्यादी) त्या शब्दांचे अनुकरण करताना मराठीने 'आहट' मधील 'ह' वर्ण गाळून त्याच धर्तीवर अनेक ध्वन्यनुकारी शब्द बनवले आहेत. (उदाहरणार्थ, किलबिलाट, चिवचिवाट, इ.) एवढेच नव्हे तर जेथे नीरव शांतता नांदते अशा वातावरणाचेही वर्णन करताना, मराठीने 'शुकशुकाट' असा मजेशीर शब्द निर्माण केला. 'शुकशुकाट' याचा हिंदी प्रतिशब्द 'साँय सॉय' (सन्नाहट, सन्नाटा) असा असून, हिंदी शब्दकोशात त्याचा अर्थ 'शून्य का आभास' असा दिला आहे. (शून्य-म. सुन्न) म्हणजे बहुतांश काळ आवाजाच्या दुनियेत वावरण्याची सवय झालेल्या माणसाला निःशब्द वातावरणातही आवाजाचा भास होत असावा.

खरी गंमत याहून पुढेच आहे, ही 'आहट' वाचक शब्दप्रवृत्ती श्रुतिसंवेदनेचा प्रांत ओलांडून हळूहळू अन्य इंद्रियांच्या प्रदेशांत घुसखोरी करू लागली. प्रथम ती हिंदी भाषिकांच्या डोळ्यांत भरली. अंधुक प्रकाशणारे तारे किंवा दिवे पाहून 'सितारों की या दीपकों की टिमटिमाहट' असा प्रयोग होऊ लागला. पहाटेच्या किंवा सायंकाळच्या धूसर संधिप्रकाशात त्यांना 'झिलमिलाहट' दिसू लागली. आधुनिक काळात मात्र सर्वत्र विजेचा संचार होताच 'बिजली की जगमगाहट' पाहून हिंदी भाषिकांचे डोळे दिपून गेले. मग ही प्रवृत्ती स्पर्शसंवेदनेला स्पर्श करती झाली. 'हलकी जलन' या अर्थाने 'चुनचुनाहट' असा शब्दप्रयोग रुढ झाला. रसनेवर थोडी 'कडुआहट' रेंगाळली तरी चेहऱ्यावर 'मुस्कराहट' दिसू लागली. मनात 'घबराहट' पैदा झाली.

मराठीने तर वरताण केली. हलक्या पावलांनी आलेला 'किलबिलाट' सोडून मराठीने 'कलकलाट' गजबजाट, थयथयाट, गडगडाट, दणदणाट, भणभणाट, खळखळाट,

कडकडाट, फडफडाट' अशा कर्णकर्कश आवाजांचा एकच हलकल्लोळ माजला आणि कान किटून ते फुटण्याची वेळ आली. एवढे होऊनही मराठीचे समाधान झाले नाही. तिच्या नाकाशी अत्तरांचा तीव्र 'घमघमाट' दरवळू लागला. तिच्या डोळ्यांना प्रखर प्रकाशाचे वेध लागले आणि तिच्या राज्यात 'चकचकाट, चकमकाट, झगमगाट, लखलखाट' अशा शब्दांची मांदियाळी झाली. याप्रमाणे इंद्रियांचा एकेक प्रदेश पादाक्रांत करताना, प्रवासात तिला वैराण वाळवंटाचा 'रखरखाट' जाणवला. कडक उन्हामुळे तिची कातडी करपून तिचा 'भगभगाट' होऊ लागला. अखेरीस ती 'मनोराज्या'त पोचली पण भीती, चीड व वेदना यांनी ग्रासली जाऊन, तिचा 'जळजळाट, चडफडाट, तळतळाट व तडफडाट' सुरू झाला. मनात 'घबराट' निर्माण झाला. मग कालांतराने तिचा 'जळफळाट' थांबून ती जरा शांत झाली आणि भाषासमृद्धीच्यामार्गे पुढे वाटचाल करू लागली. त्यामुळे दिवसेंदिवस तिचा 'फळफळाट' होऊन तिची अधिकच 'भरभराट' होईल यात शंका नाही.

प्रत्येक संवेदनेलाच नवे इंद्रिय फुटले ('श्रुतीसी श्रवण रिघाले') अशी जुन्या काळी ज्ञानेश्वरांनी विलक्षण कविकल्पना केली होती. पण आता पुन्हा ज्ञानेश्वर अवतरले तर, मराठीमध्ये सर्व पंचेंद्रियांना 'श्रुतीही रिघाल्या' चे पाहिल्यावर 'इंद्रिया लागे कळंभा येकमेका' असेच त्यांना म्हणावेसे वाटेल व त्यांच्या पंचेंद्रियांचे पारणे फिटेल!

□□□

**१६, यशोदाकुंज सोसायटी, सी. टी. एस्. ३३२,**
**तेजस् सोसायटीजवळ, कोथरुड, पुणे ४०० ०२९.**

---

जेफ ब्रॅकेट हा अमेरिकन संशोधक गेली दोन वर्षं पुण्यात राहतोय. पुण्यात तो आता रुळलाय. काही कुटुंबांशी त्याचा चांगला परिचय झालाय. मराठी अभ्यास परिषद पत्रिकाही त्याच्या नजरेखालून गेलीय. परिषदेची, ''माझी मुलं मराठी माध्यमात शिकतात, तुमची?'' ही चिकटचिठ्ठी पाहून त्यानं यापुढच्या चिकटचिठ्ठीसाठी उत्स्फूर्तपणे सुचवलेला उद्‌गार - ''माझी मुलं भारतात राहतात, तुमची ...?''

प्रेषक - विजया देव





अनुक्रमणिका

# शब्दकोड्यांची जन्मकथा

ह. अ. भावे

आज जरी शब्दकोड्यांची किंवा शब्दचौरसाची कल्पना आपण पाश्चात्यांकडून घेतली असली तरी या चौरसाचे मूळ भारतीय आहे.

अकराव्या शतकात भास्कराचार्यांनी त्यांच्या 'सिद्धांत शिरोमणी' या ग्रंथात 'भद्रचौरस' दिला आहे. या भद्रचौरसाचे वैशिष्ट्य असे आहे की, त्यात लिहिलेल्या आकड्यांची बेरीज कशीही केली तरी नेहमी एकच येते! चीनमध्येसुद्धा ३-३ चा आकड्यांचा चौरस करीत असत. त्या चौरसात काही अद्वितीय शक्ती आहे असा त्यांचा समज होता.

भास्कराचार्यांचा ग्रंथ अरबांद्वारा युरोपात १६ व्या शतकात पोहोचला. युरोपमध्ये त्या भद्रचौरसाचे नाव 'मॅजिक स्क्वेअर' झाले. त्यानंतर अनेक वर्षे हे 'मॅजिक स्क्वेअर' आकड्यांच्या करामतीसाठी वापरले जात होते.

१९१० च्या सुमारास 'केरळ-कोकिळ' या त्या काळी गाजलेल्या मासिकात शोधसूत्रे (क्ल्यू) देऊन शब्द शोधण्याची कोडी येत असत. ते शब्द सुटे असत. चौकटीत बसवलेले नसत, इतकेच.

जगातले पहिले शब्दकोडे २१ डिसेंबर १९१३ या दिवशी अमेरिकेतील 'न्यूयॉर्क वर्ल्ड' या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाले. त्या कोड्यास ३२ शोधसूत्रे होती.

इंग्लंडमध्ये असे शब्दकोडे प्रथमतः २ नोव्हेंबर १९१४ या दिवशी 'संडे एक्स्प्रेस' मध्ये प्रसिद्धझाले. तेव्हापासून पाश्चिमात्य देशातील बहुसंख्य वर्तमानपत्रांतून रोजच शब्दकोडे प्रसिद्ध होत असते. श्री. ॲड्रीयन बेल हे रचनाकार लंडनच्या टाईम्ससाठी १९३० पासून कोडी रचतात. १९७५ पर्यंत त्यांनी एकूण ४३२७ कोडी रचली.

शब्दकोडे सोडवणे हा बुद्धीचा खेळ आहे. हा खेळ एकटा मनुष्य खेळू शकतो. जोडीदाराची जरूर नसलेला हा एकमेव खेळ आहे. दिलेल्या शोधसूत्रावरून तर्क करून योग्य अक्षरांचा शब्द तुम्हाला शोधून काढायचा असतो. योग्य शब्द कोणता याचा विचार करता करता वेळ कसा गेला हे तुम्हाला समजतही नाही. बुद्धिबळाच्या खेळापेक्षा शब्दसंधानाचा हा खेळ जास्त लोकप्रिय झाला आहे. कारण ह्यात कुठलेही किचकट नियम नाहीत. वर्तमानपत्र आणि पेन्सिल याशिवाय अन्य

साधनेही लागत नाहीत, की बुद्धिबळाप्रमाणे समोर भिडूही लागत नाही. दुपारच्या वेळी गृहिणीचा मोकळा वेळ चांगला जातो. निवृत्त व वृद्ध यांना तर शब्दसंधानाचा हा खेळ फारच आवडतो. शाळेतील विद्यार्थी - अगदी चौथी-पाचवीपासूनचे - शब्दकोडे सोडवताना मला आढळले आहेत. लोकलमध्ये, एस.टी. प्रवासात तर प्रवासाचा कंटाळा कमी करण्याला यासारखा दुसरा उपाय नाही.

या खेळामुळे तुमचे मनोरंजन तर होतेच पण दुसरा एक मोठा व्यावहारिक लाभ होतो. शब्दसंग्रह वाढतो. लिखाणात, बोलण्यात सफाई येते. सर्वसामान्य मनुष्य आपल्या बोलण्यात व लिहिण्यात दोन ते तीन हजार शब्द वापरतो. पदवीधर सुशिक्षित मनुष्य पाच हजार शब्द वापरतो. तर ज्ञानेश्वर आणि शेक्सपिअर यांच्यासारखे शब्दप्रभू बारा हजार शब्दांपर्यंत शब्द वापरतात.

□□□

**'वरदा' सेनापती बापट मार्ग**

**('तुम्ही-आम्ही-आपण सगळेच' वर्ष १ अंक ३ मधून साभार) पुणे ४११०१६**

---

## आजचे वाक्प्रचार

भाषिक व्यवहार अधिकाधिक अचूक, रसमय होण्यासाठी भाषेमध्ये नवनवीन शब्द आणि वाक्प्रचार येणे आवश्यक असते. असे अनेक शब्द / वाक्प्रचार भाषिक समूहाकडून आपणहूनच बनवले जात असतात. मात्र जर ते छापील स्वरूपात आले नाहीत तर ते कालांतराने लुप्त होतात. असे तीन शब्द, वाक्प्रचार येथे देत आहे.

(१) काही वर्षापूर्वी अमिताभ बच्चन जेव्हा पूर्ण भरात होता तेव्हा 'बोलबच्चन' हा शब्द लोकांनी बनवला होता. अमिताभ बच्चन हा कृतिशूर तर बोलबच्चन हा केवळ मोठमोठ्या गप्पा करणारा. पूर्वीच्या काळी तोंडपाटीलकी करणे म्हणत. पण पाटील हे समाजातले विशिष्ट स्थान आता राहिलेले नाही. त्यामुळ तो शब्द नैसर्गिकपणे मरण पावला. हा 'बोलबच्चन' शब्द काळाशी अधिक सुसंगत.

(२) हल्लीच्या दंगलीच्या काळात 'गेम केली' हा वाक्प्रचार बऱ्याच वेळा ऐकण्यात आला. 'गेम करणे' म्हणजे एखाद्याला मारून टाकणे. हा शब्द बहुधा लालबाग, परेलमधील लोकांकडून आला असावा. कारण तिथे कॅरमचा खेळ (गेम) जोरात चालतो. दुसरी शक्यता अशी की त्याच वेळी नासिरुद्दीन शहाचा 'गेम' नावाचा चित्रपट आला होता. तिकडूनही कदाचित हा शब्द आला असावा. 'गेम करणे' याचा हळूहळू अर्थविस्तार होत गेला असावा. त्या माणसाने 'पवारांनी शेवटी नाईकांवर गेम केली' असा प्रयोग वापरला होता. म्हणजे 'गेम करणे' याचा अर्थ टप्प्याटप्प्याने, विचारपूर्वक दुसऱ्याला हरवणे असा अर्थविस्तार झाला.

लोकांच्या तोंडी असणारे असे शब्द / वाक्प्रचार छापील स्वरूपात जपून ठेवणे हे आपले कामच आहे.

**गोपाळ आजगावकर**

# भाषांतर - मीमांसा : स्वागतार्ह, संग्राह्य आणि समयोचित

गौरी देशपांडे

गेल्या काही दशकांत, भाषांतर आणि भाषांतर मीमांसा (या विषयांच्या अभ्यासांना आपल्या महाविद्यालयांत आणि विद्यापीठांत निरनिराळ्या विभागांतून महत्त्वाचे स्थान मिळाल्यापासून) यांचे स्पष्टीकरण व विवरण करणाऱ्या अभ्यासू ग्रंथाची मराठीमध्ये नितांत गरज भासू लागली होती. ती गरज हा ग्रंथ* पुरी करतो यात शंका नाही, म्हणून सर्वप्रथम त्याचे मनापासून स्वागत. इतक्या चांगल्या लेखांच्या पहिल्याच संग्रहातल्या त्रुटी दाखवत बसणे हे 'छिद्रान्वेषी' प्रवृत्तीचे द्योतक ठरेल, पण पुढच्या ग्रंथांसाठी हा उद्योग उपयुक्त वाटेल अशा विचाराने काही थोड्याच पण सहज दुरुस्त करता येण्याजोग्या त्रुटींचा उल्लेख करते आहे.

अनेक लेखक-लेखिकांचे लेख संग्रहित करून वाचकापुढे ठेवण्यातला मुख्य तोटा म्हणजे वाचकाला एक सलग निवेदन वा शैली वाचायला मिळत नाही आणि ठिकठिकाणी एकदम खटकन् सांधे बदलल्यासारखे वाटते. एखाद्या लेखिकेच्या लिखाण पद्धतीचा सराव होऊन आपण वाचलेले सरळ आकळायला लागते न लागते तोच पुन्हा नव्याने दुसऱ्या लेखकाशी झटापट करावी लागते. हा दोष उद्भवणे खरे तर अपरिहार्यच असते, पण संपादकांनी याची जाणीव ठेवून सर्व लेखांवर पूर्वसंमत सूत्रांनुसार हात फिरवून घेतल्यास निदान हा सांधेबदल इतका ढोबळ न वाटता वाचकाला जास्त सुकरपणे पार पाडता येतो. या ग्रंथाच्या संपादकांनी फक्त लेखकांच्या मागे लागून लेख मिळवणे (हेही नसे थोडके!) आणि आधी प्रसिद्ध झालेले लेख जसेच्या तसे सामावून घेणे यापलीकडे काहीच केलेले दिसत नाही. निरनिराळ्या लेखकांनी वापरलेल्या त्याच परकीय संज्ञा / शब्द / नावे यांचे एकसारखे संज्ञापन / लिप्यंकन व्हावे इतकी प्राथमिक खबरदारीही त्यांनी घेतलेली नाही. (उदा. Source

---

* भाषांतर मीमांसा, संपादक : कल्याण काळे व अंजली सोमण, प्रतिमा प्रकाशन, पुणे १९९७, मूल्य रु. २६०, पृष्ठे ४१५

* स्टायनर यांच्या नावाचा मूळ उच्चार श्टायनर असा असणार हे खरे आहे, पण ते 'इंग्रज' झाल्यावर तो इंग्रजीप्रमाणे करण्यात येतो. तीच कथा लफेव्हर यांची!

language आणि target language या सर्व परिचित आणि महत्त्वाच्या संज्ञांना निरनिराळे लेखक मराठीत निरनिराळ्या संज्ञा वापरतात, किंवा स्टायनर, लफेव्हर या विद्वानांची नावे वेगवेगळ्या तऱ्हांनी देवनागरीत लिहिलेली आढळतात*). तसेच लेखांमध्ये विभाग किंवा परिशिष्ट पाडण्याची पद्धत; ही प्रत्येक लेखकाने आपल्या मनासारखी ठेवलीय. यामुळे लेखांचे मथितार्थ समजण्यात काही आडकाठी येते असे नव्हे, पण जिवाची चिडचीड होते! आणखी एक त्रुटी म्हणजे 'कविता' या साहित्य प्रकाराच्या भाषांतराबद्दलच्या बहुतेक विवेचनांत "Lyric" या एकाच प्रकारच्या कवितेवर भर दिलेला आहे. (उदा. ''कविता म्हणजेच 'स्व' ची जाणीवपूर्वक होणारी अभिव्यक्ती' पृ. १२९, सुधाकर मराठे.) या प्रकारची कविता भाषांतर करण्यास सर्वांत कठीण हे खरे, पण काव्याचे इतर इतके निरनिराळे प्रकार असताना त्यांच्या भाषांतराबद्दलही वाचायला काही मिळावे अशी अपेक्षा अवाजवी नाही. दुसऱ्या एका महत्त्वाच्या मुद्द्याकडेही येथे दुर्लक्ष झाले आहे. (अपवाद : ह. श्री. साने), तो म्हणजे भाषांतराचे लक्ष्य - धार्जिणे रूप. भाषांतरकर्ते स्वतः (आणि हे सर्व लेखक / लेखिका) मूल-लक्ष्य, भाषा, त्यांची संस्कृती, साहित्य यांच्यातील तज्ज्ञ असल्यामुळे असेल, पण दोन संहितांच्या तुलनेत गुंतलेले असतात, आणि त्यांचे या सत्यस्थितीकडे दुर्लक्ष होते की, त्यांच्या भाषांतराचे वाचक मूलभाषा जाणत नसल्यामुळे कुठलेही भाषांतर मूलसंहिता समजून (मूलसंहितेच्या मोलाने, असे म्हणू या) वाचतात. किंबहुना वाचक भाषांतराकडे वळतात याचे कारणच मुळी त्यांचे अमुक एका मूलभाषेचे अज्ञान हे असते, त्यामुळे भाषांतराचे वाचकदृष्ट्या 'मूल्यमापन' हे त्यांनी वाचलेल्या, लक्ष्य-भाषेतील कुठल्याही संहितेच्या मूल्यमापनासारखेच असते. उदा. तुकारामांचे इंग्रजी भाषांतर वाचण्याच्या मी फंदातच पडणार नाही, कारण कुठल्याही वाचनामागचा माझा हेतू भाषांतराचे तुलनात्मक मूल्यमापन हा नसून, नवे काहीतरी वाचावे हाच असतो. वाचकांचे फाजील लाड करायचे नाहीत हे तत्त्व जरी मान्य केले तरी लक्ष्य भाषेत मला सतत खटकणाऱ्या, तळटीपांकडे डोळे वळवायला लावणाऱ्या, परिशिष्टांसाठी पाने उलटायला लावणाऱ्या, परंतु भाषांतरकाराच्या भाषांतर-प्रक्रियेच्या theory नुसार मूल-संहितेशी कडक इमान राखणाऱ्या भाषांतराच्या मी वाटेस जाणार नाही, हे उघडच आहे. अभ्यासू सेमिनारमध्ये चर्चिले जाण्यासाठी केलेले भाषांतर आणि जिज्ञासू, रसिक, पुस्तक वाचायची आवड असलेल्या, चोखंदळ इ. वाचकांसाठी केलेले भाषांतर यांत प्रचंड फरक असणार.





अनुक्रमणिका

तेव्हा, भाषांतराच्या लक्ष्यावलंबित स्वभावावर एखादा तरी पूर्ण लेख या संग्रहासाठी जमवायला हवा होता असे वाटते कारण लक्ष्य धार्जिणेपणा हा भाषांतराचा स्थायी आणि अत्यंत महत्त्वाचा गुण / अवगुण आहे अपवाद अनिकेत जावरे यांची एक तळटीप.) लेखन व्यवहारात, एक निखळ तांत्रिक लिखाण सोडता, लेखक वाचकाला डोळ्यांसमोर ठेवून लिखाण करतात असे म्हणणे चूक ठरेल, पण भाषांतरकर्त्यांना मात्र असा वाचक कल्पावा लागतो.

या संग्रहातील लेखांबद्दल आनंदाने म्हणता येते की, सर्व लेखक अमुक एक वाचकवर्ग न कल्पिल्यामुळेच कदाचित जिज्ञासू सर्वसामान्य वाचक आणि अभ्यासू वाचक या दोन्ही वर्गापर्यंत सहज पोचून त्यांचे समाधान करू शकतील. एका बाजूस गर्विष्ठ बेफिकिरी आणि दुसऱ्या बाजूस ''गरिबांचा कळवळा'' **(arrogant indifference VS. condescension)** हे दोन्ही, तसेच विनाकारण सुकरताही टाळून सर्व लेखक / लेखिकांनी 'भाषांतर' या अवघड प्रक्रियेबद्दल, तिच्या आपल्याला जाणवलेल्या, भावलेल्या, समजलेल्या, विशद करून सांगाव्याशा वाटलेल्या कुठल्यातरी अंगाबद्दल रोचक आणि थोड्याशाच प्रयत्नांती सहज उलगडेल अशा विवेचनांच्या द्वारे महत्त्वाचे आणि मौलिक लिखाण मनापासून आणि गंभीरपणे केलेले आहे.

अशोक केळकरांचा दीर्घ लेख अर्थातच सर्वांत महत्त्वाचा, बीजलेख म्हणावा लागेल. कायद्याच्या भाषेचे भाषांतर कसे करावे या वरवर नीरस वाटणाऱ्या विषयावरही सत्त्वशीला सामंत यांनी उत्तम व वाचनीय लेख लिहिला आहे. माधव आचार्य यांच्या एरवी उद्‌बोधक व उत्कृष्ट लेखात एक गोष्ट फारच खटकली. एकनाथांच्या संहितेतून त्यांनी स्त्रियांची निर्भर्त्सना करणाऱ्या ओळीच (त्यांना ''वक्तृत्वाचा बहर'' असे स्तुतीपर म्हणून) का उद्‌धृत केल्या आहेत? तऱ्हेतऱ्हेच्या 'निरूपणा' मध्ये स्त्रियांना झोडण्याची वृत्ती प्रकर्षाने आढळते हे खरे आहे. पण आज विसाव्या शतका अखेरीस ती उद्‌धृते देताना कुणाही पुरुषाला आपली त्यातील (कमसे कम) असहमती एखाद्या ओळीने नोंदवावीशी वाटू नये हे बघून खेद झाला. हिंदी-मराठी या, परस्पर भाषांतराला सोप्या वाटणाऱ्या, भगिनी-भाषांतही परस्पर-भाषांतरे खरे तर किती कठीण आहेत हे ज्या दोन लेखांतून संगोराम यांनी गंभीरपणेच, पण जाताजाता मजेदार उदाहरणे देऊन सांगितले आहे; त्यांचा आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. (त्यांनी घेतलेल्या एका उदाहरणाचे एक भाषांतर वाचून तर माझी अशी समजूत झाली की, एक स्त्री क्षण नावाच्या माणसाची पत्नी असून अनंतकाळ





अनुक्रमणिका

नावाच्या बालकाची माता आहे! अर्थात हा आकलन-दोष त्या मूळच्या-आक्षेपार्ह आणि गचाळ-वाक्यातूनही उद्‌भवतोच म्हणा!)

अशा संग्रहांमध्ये सहजच घुसणारे दोन अवगुण इथे नक्कीच टाळलेले आहेत. ज्याप्रमाणे वाचकाचे फाजील लाड आणि मुळात गंभीर वा क्लिष्ट असणाऱ्या विषयाचे विनाकारण अवमूल्यन करणारी अनाठायी सुकरता अशा लिखाणात अयोग्य ठरते, त्याचप्रमाणे अनाठायी क्लिष्टता (स्वत:ची बौद्धिक श्रेष्ठता दाखवायला?) हीही अयोग्यच आहे. या संग्रहातील लेखक/लेखिकांच्या लिखाणात हे दोन्ही अवगुण आढळत नाहीत म्हणून त्यांचे व संपादकद्वयीचेही अभिनंदन व आभार. शेवटी छिद्रान्वेषीपणे एवढेच म्हणायचे की, अत्यंत महत्त्वाच्या परंतु संपूर्ण दुर्लक्षित अशा मुद्रितशोधनाची आपण बातच सोडून देऊ या!

□□□

**३०३ कालाईल कोर्ट, क्लोव्हर व्हिलेज,**
**वानवडी, पुणे ४११ ०४०**

---

मराठीच्या पीछेहाटीविषयी खंत व्यक्त करताना वर्षांमागून वर्षं उलटत आहेत. ऑगस्ट ८९ मध्ये 'सकाळ' मध्ये प्रसिद्ध झालेला हा लेख इथे मुद्दाम पुनर्मुद्रित करत आहोत. या लेखाचे प्रेषक आहेत **श्री. अनिल झणकर,** पुणे. 'भाषा आणि जीवन' चा वाचकवर्ग वृत्तपत्रीय वाचकापेक्षा वेगळा, मराठीविषयी अधिक जागरूक आणि अधिक प्रयत्नशील आहे असा आमचा विश्वास आहे. मध्यंतरीच्या काळात भाषाविषयक लेखन, कोशनिर्मिती, मराठीचे द्वितीय भाषा म्हणून अध्ययन/अध्यापन यात काहीशी वाढ झालेली आहे. पण मराठीच्या वापरातली गुणवत्ता वाढली आहे का? 'आम्हांस आम्ही पुन्हा पहावे.' ***: संपादक***

# म्हणी : अनुभवांचे वेचक मोती

मृणालिनी शहा

मराठी भाषेचा अथवा मराठी साहित्याचा मागोवा घेतला तर मराठी भाषा प्रारंभापासून म्हणी आणि वाक्प्रचारांनी समृद्ध आहे, असे लक्षात येते. कालमानानुसार भाषेचे सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भ बदलले की काही म्हणी कालबाह्य होतात. मात्र मानवी जीवनासंबंधीच्या म्हणी चिरकाल टिकून राहतात.

श्री. दाते आणि कर्वे यांचा म्हणी व वाक्प्रचारांचा कोश प्रसिद्ध होऊन आता ५०/५५ वर्षे झाली. त्यानंतर शालेय अभ्यासक्रमावर आधारलेले छोटे-मोठे कोश प्रसिद्ध होताना दिसतात. त्यापेक्षा वेगळे असे 'आजीबाईंच्या सुपातले मोती' कमलाबाई वाघ यांचे गोमंतकीय म्हणींचे एक संकलन (१९९५) प्रसिद्ध झाले आहे. हे संकलन त्यांच्या अंगभूत वैशिष्ट्यामुळे तर वेगळे आहेच पण समाज भाषाविज्ञानाच्या दृष्टीने सुद्धा त्याचे एक महत्त्व आहे.

या ग्रंथात म्हणी व त्यांच्या कोशगत अर्थ अशी रूढ पद्धत वापरलेली नाही. आपल्या गोमन्तकातील आजीच्या तोंडच्या म्हणींची ओळख करून देण्यासाठी उपयोजिलेली पद्धत अभिनव आहे. कमलताईंनी प्रत्येक म्हणीसाठी एक प्रसंग किंवा एक घटना सांगून मग त्याला समर्पक अशी म्हण सहजतेने सांगितली आहे. म्हणीचा अर्थ सांगण्याची ही शैली प्रसंगनिष्ठ असल्याने वाचकाला त्या त्या म्हणींचा अर्थ सुलभतेने कळतो. त्यांच्या या कथनशैलीमुळे गोव्यातील कोकणीबोलीचा मराठी भाषकांना परिचय नसतानाही त्या म्हणींचा अर्थ कळतो. कितीतरी ठिकाणी त्या म्हणीच्या अर्थांच्या मराठी म्हणीही कंसात दिल्या आहेत. भाषा कोणतीही असली तरी जीवनानुभव व्यक्त करणाऱ्या म्हणी सर्वत्र सारख्याच असतात याची प्रचीती येते.

म्हणींसाठी निवडलेले प्रसंग रोजच्या जीवनात अनुभवाला येणारे आहेत. नित्याच्या व्यवहारात लागणारे शहाणपण या कथित अनुभवातून सहजतेने उलगडत जाते. खरे तर कोणत्याही म्हणीची निर्मिती ही प्रचलित अनुभवांतून झालेली असते. कमलताईंनी ही निर्मिती प्रक्रिया लक्षात घेऊन लहान लहान चुटक्यांद्वारे म्हणी सांगितल्या आहेत.

बयाबाई आमोणकर या कमलताई वाघांच्या आजी. त्यांच्या बोलण्यात पदोपदी

समर्पक म्हणींचा वापर असे आणि दहा-बारा वाक्यांत सांगायचा अर्थ एका म्हणीने ऐकणाऱ्याला चटकन उमजत असे. बयाच्या उपजत शहाणपणामुळे साऱ्या गावातील लहानथोर तिला मान देत असत. तिच्या विचक्षणतेचा वारसा कमलाबाईंनी जपला व आपल्या आजीच्या विचारधनाचा हा वारसा 'आजीच्या सुपातले मोती' या नावाने १९६१ ते १९६६ मध्ये 'अमृत' आणि 'नवनीत' या मासिकातून प्रकाशित केला होता. त्या लेखांचे हे संकलन आता पुस्तकरुपाने प्रसिद्ध केले आहे.

लेखिकेचे निवेदन बोली भाषेत आहे. त्यातील सहजपणामुळे प्रसंगाचे चित्र डोळ्यांसमोर उभे राहते. लहान लहान प्रसंगांतून व्यावहारिक ज्ञानाचे पाठच सादर केले आहेत. प्रसंगनिष्ठ शैलीमुळे महानुभाव वाङ्मयातील 'दृष्टांतपाठ' या ग्रंथाची आठवण होते. या कथनात आजी हे एक महत्त्वाचे पात्र आहे व त्यातील बोधाला एक अनुभवसमृद्धीचे परिमाण लाभले आहे. आजीबाईंच्या अनुभवाचे बोल वाचकांना जीवनाचे मर्म सहजतेने उलगडून दाखवतात.

बयाबाईंच्या उपजत शहाणपणाला लेखिकेने आपल्या कथनशैलीची जोड दिल्याने तत्कालीन गोव्यातील आचारधर्म, रूढीपद्धती आणि चालीरीती यांच्यातून समाजदर्शन घडते. म्हणी या एक प्रकारे समाजाच्या वैशिष्ट्यातून जन्माला येत असतात. त्या त्या समाजाच्या रचना, नातीगोती आणि कुटुंबव्यवस्था यातूनच त्यांचा जन्म होत असतो. त्या दृष्टीने या संकलनातील म्हणी-कथांना सामाजिक परिमाण प्राप्त झाले आहे. भाषेच्या समाजशास्त्रीय अभ्यासाला अशा प्रकारच्या संकलनामुळे निश्चितच मदत होईल.

□□□

**१ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवन**
**पुणे ४११००४**





अनुक्रमणिका

-१-

# पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधीचे निवेदन, वृत्तपत्र आणि पुस्तके नोंदणी अधिनियम कलम डी १९ बी आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम८, नमुना ४ यांना अनुसरून

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र
२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये.
३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४, एरंडवन, पुणे ४११ ००४.
४. मुद्रणस्थळ : सिद्धी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११ ०२९.
५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे.
६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : विजया देव, भारतीय, सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, पुणे ४११ ००४.
७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता : एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा: अशोक रा. केळकर, ७ धनंजय सोसायटी, ७५९/८३ शिवाजीनगर, पुणे ४११ ००४

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**पुणे ३० जून १९९८** **मृणालिनी शहा,**
**प्रकाशक.**

□□□





अनुक्रमणिका

-२-

## दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोश व साहित्य सूची

गेल्या ५० वर्षांतील महत्त्वाचे मराठी साहित्य म्हणजे दलित व ग्रामीण साहित्य होय. त्यातील जीवनानुभव ज्या भाषिक रूपांतून प्रकट झाले आहेत त्यांचा विविधांगी अभ्यास करावा या हेतूने राज्य मराठी विकास संस्थेने दलित व ग्रामीण साहित्य शब्दकोश तयार करण्याचे ठरविले आहे. या कोशाची मांडणी सर्वसाधारण इतर शब्दकोशांप्रमाणे असेल. त्याचप्रमाणे ती सामाजिक, सांस्कृतिक अंगानेही केली जाईल. आजच्या प्रमाण मराठी कोशातून या साहित्यातील शब्द, म्हणी, वाक्प्रयोग, संज्ञा, संकल्पना अंतर्भूत झालेले नाहीत. ही उणीव दूर करण्याच्या हेतूने सुमारे एका वर्षापूर्वी शब्दकोशाचे व सूचींचे काम राज्य मराठी विकास संस्थेने सुरू केले आहे.

सदर कोश व सूचीमध्ये काही उणीव राहू नये या हेतूने सर्व दलित आणि ग्रामीण साहित्यिकांनी व प्रकाशकांनी आपापल्या प्रकाशित झालेल्या पुस्तकाची/ पुस्तकांची तपशीलवार माहिती (स्वत:चे नाव, पुस्तकाचे नाव, प्रकाशन वर्ष, प्रकाशक, साहित्यप्रकार, किंमत, पृष्ठसंख्या इत्यादी) राज्य मराठी विकास संस्थेकडे पाठवून सहकार्य करावे.

**संपर्क :** राज्य मराठी विकास संस्था, एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महानगरपालिका मार्ग, धोबीतलाव, मुंबई - ४०० ००१
दूरध्वनी - २६५ ३९ ६६

**सरोजिनी वैद्य**

□□□

---

वाघाचा डोळा म्हणजे रूपया म्हणे! भिक्षुक मंडळीत हा वाक्प्रचार आहे हे आजच्या मध्यमवयाच्या लोकांनाही माहीत नाही. एकेकाळी रूपयाला तितकीच किंमतही होती! हल्ली भिक्षुकमंडळी बऱ्याचदा ध्वनिफितीतच जाऊन बसली आहेत आणि वाघाचा डोळा कसला, रूपया म्हणजे मुंगीच्या मिचमिच्या डोळ्याइतका (अर्थशास्त्रीय दृष्टिकोनातून) छोटा बनून राहिला आहे. 'वाघाचा डोळा' म्हणजे 'अमेरिकी डॉलर' असा समज रुजवायला हरकत नसावी असे वाटते.

डॉ. सुरेश नाडकर्णी





अनुक्रमणिका

# परिषदवार्ता

१. मराठी अभ्यास परिषद ही संस्था ३.११.९५ रोजी विश्वस्तव्यवस्था अधिनियम १९५० (सन १९५० चा मुंबई अधिनियम क्र. २९) या अन्वये पुणे विभाग, पुणे येथील सार्वजनिक विश्वस्तव्यवस्था नोंदणी कार्यालयात योग्य रीतीने नोंदवण्यात आलेली आहे.(एफ ११४५८/ पुणे)

२. मराठी अभ्यास परिषदेला दिल्या जाणाऱ्या देणग्या भारतीय आयकर अधिनियमाच्या कलम ८०-जी अन्वये करमुक्त असतात. (क्र. पीएन्आयटी / ८० जी / एम.इ. ३६५ / ९७-९८)

३. मराठी अभ्यास परिषद या सार्वजनिक विश्वस्त व्यवस्थेला पेंग्विन चॅरिटेबल ट्रस्ट, माहीम, मुंबई यांनी रु. ५०,००० = ०० (पन्नास हजार रुपये फक्त) कायमनिधीसाठी म्हणून देणगी रूपाने दिले आहेत.

४. मराठी अभ्यास परिषद या संस्थेची वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार दि. ३० ऑगस्ट १९९८ रोजी दुपारी ४ वाजता डॉ. अशोक रा. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली पार पडली. सभेचे स्थळ राजवाडे सभागृह, भारत इतिहास संशोधन मंडळ हे होते. विषयपत्रिकेनुसार सभेचे कामकाज पार पडले.

५. 'भाषांतर मीमांसा' या पुस्तकापाठोपाठ 'निवडक भाषा आणि जीवन' हे पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन' या त्रैमासिकातील निवडक लेखांचा हा संग्रह असून त्याचे संपादन डॉ. कल्याण काळे आणि डॉ. मृणालिनी शहा यांनी केले आहे. (पृष्ठसंख्या २९५, किंमत रु. २००)

**पैसे भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेकसबोतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ७५ रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला १०० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील यापैकी असो)२०रु.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी :**

सामान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ ३५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ७५ रु. + ३५ रु. असे एकूण ११० रु. भरावे लागतील.

**जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु. पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

